# शिवसंभव नाटक.

—लेखक—

वासुदेव वामन खरे.

—प्रकाशक—

परचुरे, पुराणिक आणि मंडळी,

बुकसेलर्स आणि पब्लिशर्स, मुंबई नं. ४.

( आवृत्ति तिसरी )

शके १८५६ ] किंमत १२ आणे [ जून १९३४

# प्रस्तावना.

नाटक म्हटलें म्हणजे तें ऐतिहासिक असलें तरी त्यांत कल्पित पात्रें व प्रसंग घालावेच लागतात, व तसे ते याही नायकांत घातले आहेत. तसें करण्याविषयीं नाट्यशास्त्राची संमति आहे व कविसंप्रदायही तसाच आहे. तथापि ही कल्पनासृष्टि कोणत्या संदर्भामुळें निर्माण करण्यांत आली हें स्पष्ट केलें म्हणजे ज्यांनीं या नाटकावर आक्षेप घेतले आहेत त्यांचें समाधान निराळें करावयास नको. नाटकाच्या संविधानकांत जो इतिहास आला आहे त्यासंबंधानेंही थोडी चर्चा करणें जरूर आहे. सबब या दोन मुद्यांवर येथें थोडें लिहितों.

या नाटकांत मोंगल व जाधवराव यांनीं शहाजीवर जी मोहीम केल्याचें वर्णिलें आहे ती प्रत्येक मराठी बखरींत नमूद केलेली आहे, तर मुसलमानी इतिहासांत व त्यांच्या आधारें तयार झालेल्या इंग्रजी इतिहासांत तिचा मागमूससुद्धां नाहीं! असें असल्यामुळें संविधानकाच्या तपशीलाबद्दल बखरींवर सर्व भिस्त टाकणें भाग पडतें. आणि त्या बखरींतून तर असंबद्ध मजकूर किती ओतप्रोत भरलेला असतो तें प्रसिद्धच आहे! त्या मजकुराची छाननी करून त्यांतून सत्य निवडून काढणें हें कोणाही ऐतिहासिकाच्या बुद्धीला शीण देणारें फार प्रयासाचें काम आहे. तें काम आजपर्यंत रा. विश्वनाथपंत राजवाड्यांखेरीज कोणीही केलेलें नाहीं त्यांनीं मात्र परिश्रमपूर्वक विचार करून आपल्या चवथ्या खंडाच्या प्रस्तावनेंत सर्व बखरींचा निष्कर्ष काढला आहे. या नाटकाला आधारभूत असलेलें शहाजीचें चरित्र त्यांनीं त्या प्रस्तावनेंत जसें वर्णिलें आहे तसें तें मला बहुतांशीं मान्य आहे. मात्र त्यांपैकीं ज्या गोष्टी मला पटत नाहींत व ज्यांबद्दल बखरींतला मजकूर मला त्याज्य वाटत नाहीं त्या येथें नमूद करितों.

(१) मूर्तुजा निजामशहा स. १६२६ मध्यें मेला म्हणून रा. राजवाडे लिहितात तें बरोबर नाहीं. कारण पुढें स. १६३१ त याच मूर्तुजाचा फत्तेखान वजीरानें खून केलेला आहे. (ग्रांट डफ्; पृ. ४७) (२) स. १६२७ त मोंगल व जाधवराव यांणीं शहाजीस माहुलीच्या किल्ल्यांत कोंडलें असतां तो तेथून निसटला ही गोष्ट बहुतेक बखरींतून आढळते. अलीकडच्या शोधावरून हा मजकूर स. १६३० च्या प्रारंभीं घडला असावा असें दिसतें. रा. राजवाडे ही मोहीस कां खरी धरीत नाहींत

हें समजत नाहीं. स. १६३० व स. १६३६ या दोन्ही वर्षी शहाजीस शत्रूंनीं माहुलींत घेरलें होतें. त्यांत पहिल्या खेपेस तो निसटून गेला व दुसऱ्या खेपेस त्यानें तह करून आपली सुटका करून घेतली हें खरें असूं शकण्याला काय हरकत आहे? (३) शहाजी माहुलीहून पळून जात असतां जाधवराव व मोंगल यांनीं त्याचा पाठलाग केला. त्या प्रसंगीं जिजाऊला गर्भभारामुळें पळवेना, सबब शहाजी तिला तशीच वाटेंत टाकून पुढें निघून गेला असें कोठें कोठें लिहिलें आहे; तर याच्या उलट कित्येक बखरींत शहाजीनें जातां जातां तिला शिवनेरीस पोंचतें केलें असेंही लिहिलें आहे, व तेंच मीं ग्राह्य धरलें आहे. रा. राजवाडे यांसदेखील ही गोष्ट मान्य आहेच. मात्र शिवनेरीस ठेवण्याकरितां शहाजीनें जिजाऊला आपला मित्र व जुन्नरचा अधिकारी श्रीनिवासराव याच्या हवालीं केलें, असें रा. राजवाडे बखरींच्या आधारावरून म्हणतात. माझ्या मतें शहाजीला आपली स्त्री शिवनेरीस ठेवावयाची तर ती श्रीनिवासच्याच हवालीं करावयाला पाहिजे होती असें नाहीं. कारण, शिवनेरी हा किल्ला पूर्वीपासून शहाजीच्या ताब्यांतलाच होता. (४) नवऱ्याच्या आज्ञेवरून जिजाऊ शिवनेरीस जात असतां जाधवरावानें तिला गांठली ही गोष्ट बहुतेक बखरींतून लिहिलेली असल्यामुळें ती मीं ग्राह्य धरलेली आहे. राजवाडे यांची याबद्दल तितकी पक्की खात्री नाहीं.

शिवाजीच्या खेपेस जिजाऊ गर्भवती होण्यापूर्वी शहाजीला एक गोसावी भेटून त्यानें त्याला 'अमृतफल' (आम्रफल?) दिलें वगैरे मजकूर शेडगांवकर बखरींत पृष्ठ ११ वर दिला आहे; त्याचेंच प्रयोगाच्या सोईसाठीं रूपांतर करून मी या नाटकाचा पहिला प्रवेश बनविला आहे. शहाजी पळत होता त्यास जाधवरावानें फलटणापर्यंत वगैरे पिटून घातलें इत्यादि मजकूर कित्येक बखरींतून आहे, तर त्याच्या उलट शहाजीनेंच मोंगल व जाधवराव यांचा पराजय केला असें मीं लिहिलें आहे त्यालाही बखरीचा आधार आहे. (शेडगांवकर बखर पृ. १३ व शिवप्रताप पृ. ५६) शिवाजीचा जन्म शिवनेरीस झाला त्या वेळीं तेथें जाधवराव कुटुंबसुद्धां हजर होते असें मीं नाटकाच्या शेवटच्या प्रवेशांत दाखविलें आहे, त्याला आधार 'शिवभारत' नांवाचें तामीळ भाषेंतलें शिवाजीचें चरित्र नवीन सांपडलें आहे त्याचा आहे. सदरहू पुस्तकाचें मराठी भाषांतर भा. इ. सं. मंडळाचे एक सन्मान्य सभासद करीत आहेत.

शहाजी व जाधवराव यांचें वैमनस्य कशाबद्दल उत्पन्न झालें याविषयीं प्रत्येक बखरींत पुढें लिहिल्याप्रमाणें मजकूर असतो.—"बादशहा मेला तेव्हां त्याचा

मुलगा अल्पवयी होता, सबब बादशहाच्या स्त्रीनें शहाजीस वजीर नेमून राज्य संभाळण्याचें काम त्यावर सोंपविलें, आणि माझ्या मुलास मांडीवर घेऊन दरबारांत बसत चला म्हणून सांगितलें. त्याप्रमाणें शहाजी करूं लागला. तेव्हां अल्पवयी बादशहास घेऊन तक्तावर बसणाऱ्या शहाजीस मुजरा करणें जाधवरावास पराकाष्ठेचें अपमानकारक वाटूं लागलें. सबब त्यानें शहाजीला राज्यांतून हुसकून लावण्याकरितां दिल्लीहून फौज आणवून त्यावर मोहीम केली.'' परंतु बखरींतल्या या मजकुराला इतिहासाशीं मेळ बसणें अशक्य आहे. शहाजीनें दोनदां वजीरी केली. त्याची पहिली वजीरी स. १६३० त झाली ती वर्ष सहा महिने टिकली. त्या वेळचा बादशहा अगर सुलतान मुर्तुजा निजामशहा हा शहाजीच्याच वयाचा किंबहुना त्यापेक्षां वयाने थोडा मोठाही असण्याचा संभव आहे. दुसऱ्या खेपेला स. १६३३ त शहाजीनें स्वतःच निजामशाही वंशापैकीं एक लहान मुलगा गादीवर बसवून त्याची वजीरी केली. ती तीन वर्षे चालली होती. पहिल्या वजीरींत जाधवराव हयात होता. पण बादशहा वयानें लहान नव्हता. दुसऱ्या वजीरींत बादशहा अल्पवयी होता तर जाधवराव मरून तीन वर्षे झालीं होतीं! यावरून असा तर्क होतो कीं; बखरवाल्यांनीं शहाजीच्या दोन वजीऱ्यांत अंशतः घडलेला मजकूर एकत्र करून हा सावळागोंधळ केलेला आहे! मात्र ज्याअर्थी शहाजी बादशहासह तक्तावर बसला असतां लुकजीनें त्यास मुजरा करण्याचें नाकारल्याचा मजकूर प्रत्येक बखरींत आढळतो, त्याअर्थी तो खरोखरच केव्हां तरी घडला असला पाहिजे व तो घडण्यास स. १७३० खेरीज दुसरा प्रसंग नाहीं, असें धरून त्या आधारावर मीं दुसऱ्या अंकांतला दुसरा प्रवेश सजविला आहे.

लुकजी जाधवराव व त्याचा भाऊ जगदेवराव हे पराक्रमी बलाढ्य सरदार होते यांत संशय नाहीं. लुकजीनें शहाजीशीं द्वेष करून त्याचा नाश करण्याचा उद्योग केला व लुकजीच्या मागून जगदेवरावानें शहाजीच्या पडत्या काळांतसुद्धां त्यावर वैर उगविण्यांत आळस केला नाहीं. (ग्रांटडफ् पृ. ५५). या दोघां बंधूंच्या विरोधामुळें शहाजीचा उत्कर्ष जर कुंठित झाला नसता तर महाराष्ट्रांत स्वराज्याची स्थापना शिवाजीनें केली ती शहाजीनेंच केली असती! आपल्यापैकीं कोणी हिंमत धरून मोठमोठ्या मसलतींस हात घालूं लागला तर त्याचा हेवा करून पाडाव करण्यासाठीं शत्रूलासुद्धां सामील होण्याचा दाखला जो या जाधवरावबंधूंनीं घालून दिला तोच पुढें घोरपडे, सावंत, मोरे, सुर्वे, वगैरे प्रसिद्ध मराठे सरदारांनीं उचलल्यामुळें शिवाजीस सुद्धां फार त्रास झाला.

इतिहासकार केव्हांही झालें तरी जाधवरावांच्या या स्वराज्यद्रोही वर्तनाचा कडक शब्दांनीं धिक्कारच करील. परंतु नाटककारास इतकें न्यायनिष्ठुर होण्याचें कांहीं कारण नाहीं. वेरूळकर भोंसले व सिंदखेडकर जाधव यांत तंटा माजला त्यांत जाधवांचें राजकीय धोरण चुकलें असेल, पण ते जाधव तरी एका काळीं आपल्यांतलीं बडीं प्रस्थें होतीं, मोठे शूर दौलतवंत होते, त्यांतून लुकजी हा नायिकेचा बाप व नाटकांतील प्रतिनायक होय, या गोष्टी नाटककारास विसरतां येत नाहींत. लुकजी हा मत्सरी, क्रोधी, दीर्घद्वेषी, दुराग्रही होता हें जसें इतिहासावरून दिसतें तसें तें नाटकावरूनही दिसून येईलच. पण मुख्यत्वें तो शूर, मानी, उदार सत्यवचनी, धर्मपरायण व दिल्लीच्या बादशहांचा निस्सीम इमानी सेवक होता, असेंच त्याचें वर्णन या नाटकांत जागोजाग मीं केलें आहे, तें नायकाशी तो तुल्यतेज दिसावा म्हणूनच केलें आहे. जाधवरावांचा भोंसल्यांविषयींचा द्वेष व धिक्कार एकतर्फी व अहेतुक न दिसावा म्हणून भोंसलेही त्यांचा त्वेषानें अपमान व धिक्कार करीत होते असें दाखवणें ओघानेंच आलें, व तसें तें अं. १ प्र. २, अं. २, प्र. २ व ४ वगैरे स्थळीं दाखविलें आहे. अं. १ प्र. ४ मधलें लुकजीचें वर्तन ' विनाशकाले विपरीतबुद्धिः' या श्लोकोक्तीस अनुसरून होत असल्याचें दर्शविलें आहे. सुवासिनीची ओंटी उधळल्याचें दुश्चिन्ह त्याच्या हातून घडल्याचें दाखविलें आहे तें शहाजीवर केलेल्या मोहिमेंत त्यास प्राप्त होणाऱ्या पराजयाचेंच केवळ सूचक नसून पुढें त्यावर जो भयंकर अनर्थ ओढवला त्याचेंही सूचक आहे. तो अनर्थ हाच कीं, पुढें वर्ष सहा महिने होतात न होतात तोंच मूर्तुजा निजामशहा याच्या हातून लुकजी जाधवराव पुत्र अजलोजी व राघोजी व नातू बसवंतराव यांसह दग्यानें मारला गेला व त्याच्या वैभवाचा विध्वंस होऊन त्याचा निर्वंश झाला !

जिजाऊ शिवनेरीस जात असतां लुकजीची व तिची गांठ पडली, व त्यानें तिला शिवनेरीस पोहोंचतें केलें, असा इतिहास असल्यानें संविधानकांत मोठीच अडचण उत्पन्न झाली. जिजाऊला मुलगा होणार व तो छत्रपति होऊन मोंगल बादशाहीचा नाश करणार हें जर जाधवरावाला आगाऊ कळलें होतें, तर त्यानें तिला जाऊं कसें दिलें ? आपल्या घरीं कां नेलें नाहीं ? यद्यपि त्यानें जाऊं दिलें असलें तरी बरोबर मोंगल होते त्यांनीं तिला धरण्याचा यत्न कां केला नाहीं ? जर त्यांनीं यत्न केला असेल तर तें जाधवरावाला कसें पाहवलें ? असे प्रश्न उद्भवूं

लागले. तेव्हां ही अडचण दूर करण्याकरितां जाधवरावाकडून रायबा व इसामिय्या यांस निरनिराळीं वचनें आगाऊच देववण्याची योजना करावी लागली. मुलगी तुम्ही कैद करूं लागल्यास मी हरकत करणार नाहीं असं मानी जाधवरावानें मोंगल सरदारास कसें वचन दिलें? या प्रश्नास क्रोधी जाधवरावानें क्रोधाच्या भरांत तसें वचन दिलें व मागून पश्चात्ताप पावला, हें उत्तर विसंगत नाहीं.

इसामिय्या हें पात्र कल्पित आहे. जाधवरावाच्या मदतीस आलेल्या मोंगल सरदाराचें नांव मीरजुमला असें बखरींतून दिलेलें असतें व क्वचित् मोहबतखान याचेही नांव आढळतें; पण वस्तुतः हे दोन्ही नामांकित पुरुष या वेळीं दक्षिणेंत नव्हते. जाधवरावाच्या कुमकेस आलेला हा दुसराच कोणी सामान्य सरदार असेल. जिजाऊला मुलगा होईल तो मोंगलाईचा उच्छेद करील, सबब त्याचा नाश केला पाहिजे, हा इसामिय्याचा दुराग्रह व्यक्तिविषयक समजावा. मोंगल सरकाराला जर कांहीं तसें खरोखरच वाटलें असतें तर त्यानें सर्व शक्ति एकवटून शिवाजीचा अथवा त्याच्या आईचा केव्हांच नाश करून टाकला असता, हें स्पष्टच आहे.

या नाटकांत स्वामी आले आहेत तें कल्पित पात्र आहे. लोक त्यांना श्रीरामदासस्वामी समजतात ! समर्थांशीं जर कोणाला या स्वामींचें साम्य दिसत असेल तर तो काकतालीयन्याय होय.

हें नाटक बसविण्याच्या कामीं ज्यानीं फार परिश्रम घेतले व मला प्रयोगाच्या दृष्टीनें मार्मिक सुधारणा सुचवून तो नांवारूपास आणिला, त्या महाराष्ट्र नाटक मंडळींतील नटवर्गाचा मी फार आभारी आहे. या संबंधें त्या नाटक मंडळीचे चालक रा. रा. अण्णासाहेब कारखाननीस व रा. रा. दाते व रा. रा. औंधकर यांचा नामनिर्देश अवश्य केला पाहिजे. ही महत्त्वाची गोष्ट पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत नमूद करण्याचें निवळ विस्मरणानें राहिलें; सबब त्या चुकीची दुरुस्ती मी येथें मोठ्या संतोषानें करितों.

मिरज, ता. २० मे सन १९२२. **वासुदेव वामन खरे.**

---

# पात्रें.



## पुरुष.

**निजामशहाः**—दौलताबादेचा सुलतान.

**लुकजी जाधवरावः**—मोंगलबादशाहीचा एक मराठा सरदार.

**जगदेवराव जाधवरावः**—लुकजीचा भाऊ.

**शहाजी भोंसलेः**—दौलताबादेच्या सुलतानाचा वजीर

**इसामिय्याः**—एक मोंगल सरदार.

**कमालखानः**—इसामिय्याचा नोकर.

**रायबाः**—शहाजीचा नोकर.

**स्वामीः**—एक ब्रह्मचारी सिद्ध पुरुष.

**बक्षीः**—जाधवरावाचा सैन्याधिकारी.

भालदार, चोपदार, दरबारी, शिलेदार, शिपाई, हेर, टेहळ्या, जासूद वगैरे निरनिराळ्या पक्षांचे लोक.

## स्त्रिया.

**जिजाऊः**—शहाजीची स्त्री.

**म्हाळसाबाईः**—लुकजीची स्त्री.

**रुक्मिणीः**—म्हाळसाबाईची दासी.

**उपाध्यीण.**<br>**देशमुखीण.**<br>**पेशकारीण.**<br>**जुमलेदारीण.**<br>**किल्लेदारीण.**<br>**सुभेदारीण.** } सिंदखेडच्या स्त्रिया.

**स्थळेंः**—दौलताबाद, सिंदखेड, माहुली, सह्याद्रीचें जंगल, शिवनेरी वगैरे.

॥ श्री ॥

# शिवसंभव नाटक.

## अंक १ ला.

### प्रवेश १ ला.

**स्थळः**—दौलताबाद. भोंसल्यांचा वाडा–जिजाऊचा महाल.

( जिजाऊ येते व समोरच्या तसबिरीस नमस्कार करिते. )

**जिजाऊः**—( हात जोडून ) जय जय जगन्माते ! आदिमाये ! परमेश्वरी ! महिषासुरादि दैत्यांचा निःपात करणारा तुझा खड्ग आम्हांवर संकटें आणणाऱ्या सांप्रत काळच्या दैत्यांचा संहार करो ! तुझा वरदहस्त महाराष्ट्राच्या कल्याणासाठीं जे आम्हीं हेतु धरले आहेत ते पूर्ण करो ! तुझ्या कृपेची सावली आमच्या मनस्तापाचें शमन करो ! ( किंचित् स्तब्ध राहून ) आजच्या दिवसाचा कांहीं महिमाच विलक्षण दिसतो ! जें मंगलसूचक स्वप्न मला पडलें तें अशा वेळीं पडलें आहे कीं त्याची प्रचीत हटकून ताबडतोब आलीच पाहिजे ! आणि शकुनही पण मला सकाळपासून तसेच होताहेत ! हें काय बरें असेल ? आमचें अनेक जन्मांचें पुण्य मूर्तरूपानें प्रगट होण्याकरितां ज्या प्रसंगाची प्रतीक्षा करीत असेल असा तर कांहीं प्रसंग आज घडून येणार नसेलना ? आजच्या आनंदाचा अनुभव जन्मांत यापूर्वी कधीं मला आलेला नाहीं एवढें मात्र खरें ! प्रियजनाला दुःख निवेदन केलें असतां तें कमी होतें आणि हर्ष निवेदन केला तर द्विगुणित होतो हें जर खरें आहे, तर माझा हर्ष महाराजांना कळवून तो द्विगुणित केल्याखेरीज मी कशी राहीन ? ( स्मरण झाल्यासारखें दाखवून दचकते. ) अग बाई ! आज स्वारी इथें नाहीं हें मी अगदींच विसरलें ! किती घटका आतां वाजल्या असतील बरें ! ( इकडे तिकडे पाहून ) हो, चार घटका तर खचित वाजून गेल्या आहेत, आणि महाराजांची स्वारी अजून परत आली नाहीं ! भोंसले आणि जाधव यांत हाडवैर पडलें आहे तें मोडून टाकायचें,

आणि दोघांची मैत्री करायची, असें निंबाळकर भावोजींनीं ठरवून मध्यस्थी पत-करली, आणि वेरूळास आपल्या गोटांत दोन्ही बाजूंची खाशी खाशी मंडळी मुद्दाम काल मेजवानीच्या निमित्तानें बोलावून नेली. तिकडे जातांना अगदीं खात्रीनें सांगायचें झालें कीं, उद्यां सकाळीं चवथ्या घटकेला परत येईन. घटका तर चार वाजून गेल्या आणि येणें तर अजून झालें नाहीं, हें कसें काय झालें असेल न कळे ! ( घटका वाजतात त्या मोजते. ) एक. दोन. तीन. चार. मी म्हटलेंच होतें चार घटका वाजल्या म्हणून ! पांच ! हो, चुकलें बरें का ! चार नाहीं, पांच घटका वाजल्या. सहा ! अगबाई ! सहा घटका ! सात ! आज घड्याळजीला वेड तर नाहीं लागलें ! आठ. छे. छे. आतां मात्र शर्थ झाली ! हो, पण थांबल्या. थांबल्या एकदां वाजायच्या ! एकून चारीच्या जागीं आठ घटका दिवस आला ! आनंदाच्या भरांत किती काळ लोटला हेंही भान मला राहिलें नाहीं ! येण्याचा संकेत चार घटकांनीं टळला तेव्हां आतां कुठे मी निर्दय चांडाळीण जागी होतें आहें. इतका कां बरें उशीर व्हावा ? हे दम्याफटक्याचे दिवस. कांहींच्या बाहींच मनांत येऊं लागतें, आणि मग अगदीं चैन पडेनासें होतें ! निंबाळकरांची मध्यस्थी आहे, तेव्हां भीतीचें कांहीं कारण नाहीं हें खरें, पण उतावीळ मनाचें तेवढ्यानें समाधान कसें होणार ? ( किंचित् थांबून ) छे ! हें नाहीं उपयोगाचें ! रायबा ! रायबा ! ये ये लवकर. असशील तसा ये आधीं ! ( रायबा धांवत येतो. )

**रायबाः**—मला बोलावलेंत बाईसाहेब ?

**जिजाऊः**—अरे, तसाच काळजीचा प्रसंग आला तर माझ्या रायबाखेरीज मी कोणाला हांक मारूं ? हें पहा, असाच अगदीं टाकोटाक वेरुळाला जा, आणि स्वारी इकडे यायला उशीर कां लागला हें समजून घेऊन मला येऊन सांग.

**रायबाः**—जी बाईसाहेब ! ( धांवत जाऊं लागतो. )

**जिजाऊः**—( हंसत ) अरे धांवतोस कां ?

**रायबाः**—धांवत जातों आणि पळत येतों बाईसाहेब !

**जिजाऊः**—अरे थांब. थांब, तूं चाललास कुठें ?

**रायबाः**—तुम्हीं नाहीं का मला वेरुळाला जायला सांगितलेंत ?

**जिजाऊः**—होय. पण तूं असाच का पळत जाणार ?

**रायबाः**—हें काय ! तुम्ही टाकोटाक जा म्हणालांत ना ?

**जिजाऊः**—पण असा प्राण कासावीस करीत वेरुळाला जा असें मीं तुला सांगितलें नाहीं. चांगली घडीपगडी कर, हत्यार बांध, पागेंतलें एक चांगलें चलाख घोडें घे, आणि मग तुला काय जलदी करायची ती कर; असा माझ्या बोलण्याचा अर्थ बरें का!

**रायबाः**—असला तुमचा अर्थ होता तर रायबाला कशाला बोलावलेंत? नाहीं मी जात! पाठवा दुसऱ्या कोणातरी गोमाजी तिमाजीला!

**शहाजीः**—( एकदम प्रवेश करून ) रायबा, रायबा, आतां तूं नकोस, आणि गोमाजी तिमाजी कोणीच नको जायला! ( जिजाऊ लाजून उभी राहते. )

**रायबाः**—( हंसत ) ही तर निराळीच गम्मत झाली! ( जातो. )

**शहाजीः**—( हंसत ) माझ्या येण्याची वेळ केवळ चार घटकांनीं चुकली तर मनाची इतकी गडबड उडाली; आणि वर्षानुवर्ष देखील आमची भेट न व्हावी असाच योग आला तर काय कराल?

**जिजाऊः**—दैवयोगच तसा येईल तर तसेंही वागण्याचें धैर्य नाहीं का देव देणार? पण खरेंच गडे, इथे आड उभें राहून माझें बोलणें किती वेळ ऐकायचें झालें? ( रुसव्याच्या स्वरानें ) माझी अशी तारांबळ उडावी, आणि आपण मौज पहात रहावें, हें चांगलें वाटलें ना?

**शहाजीः**—( हंसत ) या. या. कांहींतरी निमित्त काढून रुसवा करूं नका! रायबाच्या शेवटच्या शब्दांखेरीज मीं कांहींच ऐकलें नाहीं. हा मी आतांच वेरुळाहून येतों आहें. झालें आतां? झाली समजूत?

**जिजाऊः**—( हंसत ) नाहीं झाली समजूत! अशी कशी एवढ्या तेवढ्यानें समजूत होते आहे? ज्या कामाकरितां काल जाणें झालें, त्या कामाचें काय काय झालें तें सगळें मला सांगायला पाहिजे.

**शहाजीः**—त्याची पंचाईत तुम्ही कशाला करतां? घरचा व्याप काय तुम्हांला थोडा झाला म्हणून राजकीय भानगडींत मन घालतां?

**जिजाऊः**—कां बरें मीं पंचाईत करूं नये? माझें माहेर मला पुन्हां मिळणार कीं न मिळणार, हें नको वाटतें मला समजायला?

**शहाजीः**—समजा, तुमचें माहेर तुम्हांला पुन्हां मिळालें, तर तुम्ही तिकडे जाणारच असाल जशा!

**जिजाऊः**—नाहीं, मागच्या खेपेप्रमाणें जर बाबांच्या मनांत कांहीं कारस्थानीचा डाव उगवून घ्यायचा असेल तर कशी जाईन? भोंसल्यांच्या घरांत मला द्यायचें त्यांच्या मनांत कधींच नव्हतें, पण, देणें पडलें भाग! मग दगडाखालीं सांपडलेला हात कसा तरी सोडवून घेण्यासाठीं माझ्या संभाजी राजाला मोठ्ठी मोठ्ठी मोंगलाई सरदारी बादशहाकडून देववायची आणि पुढें मागें बापलेकांची लढाई लावून द्यायची; हा होता त्यांचा त्या वेळचा डाव! पण मी बरा तो साधूं देईन! आतां माझें मन त्यांना चांगलेंच कळलें आहे. पुन्हां नाहीं ते असल्या फंदांत पडायचे!

**शहाजीः**—( हंसत ) त्यांचा डाव तुम्हीं साधूं दिला असता तर काय वावगें झालें असतें? आयता संभाजी राजाला मोंगलाई राज्यांतला पहिल्या प्रतीच्या सरदारीचा मानमरातब भोगायला सांपडला असता, गजेंद्रलक्ष्मी आणि महींद्रवैभव प्राप्त झालें असतें, सारें छानच होत होतें!

**जिजाऊः**—मोंगलांच्या गुलामगिरींत माझ्या मुलाला महींद्राचेंच काय, पण महेंद्राचें वैभव मिळत असलें तरी तें मला मुळींच नको आहे! त्यापेक्षां स्वदेशी-यांच्या पक्षांत बारगिरी करून सुद्धां त्यानें जन्म घालवला तरी मला शंभरपटीनें पुरवेल! त्याचे वाडवडील पूर्वीपासून जें करीत आले तेंच करण्यांत त्याला भूषण आहे. बरें, पण हें नवेंच बोलणें काढून कालच्या भेटींत काय निष्पन्न झालें हें सांगायची टाळाटाळ चालवलेली दिसते. खरेंच गडे, सांगावें ना काय झालें तें!

**शहाजीः**—( हंसत ) हो हो! या! सांगतों तुम्हांला सारें. अशा जवळ बसा. या! ( जिजाऊ येऊन जवळ बसते. )

**जिजाऊः**—हां! सांगावें आतां!

**शहाजीः**—सांगूंच तर? कांहीं झालें नाहीं!

**जिजाऊः**—अशी नाहीं हां आतां थट्टा करायची! काय झालें तें खरें खरें सांगायला पाहिजे.

**शहाजीः**—खरेंच सांगतों ना? कांहीं झालें नाहीं! निंबाळकरांच्या गोटांत आम्ही सर्व भोंसले मंडळी जमलों होतों, आणि जाधवही थोडेबहुत आले होते. पण मुख्यत्वें ज्यांसाठीं मेजवानीचा थाटमाट, ते जाधवराव मुळीं निंबाळकरांकडे आलेच नाहींत! मग काय करायचें! जसे गेलों तसे निघून आलों! जाधवरावांनीं आमची फार निराशा केली आणि त्यामुळें आम्हां सर्वांना त्यांचा फार राग आला.

आहे. केवळ आमच्या कुळाचा उत्कर्ष पहाववेना, म्हणून हे निजामशाहीचे सर्वांत बलिष्ठ सरदार आम्हांशीं भांडून आमचे हाडवैरी जे मोंगल त्यांना जाऊन मिळाले ! आम्ही त्यांचे आप्त असतां आम्हांला बुडविण्यासाठीं हे धर्मद्वेष्ट्या मोंगलांचे गुलाम बनले आहेत ! आपला आश्रय शत्रूला मिळाला म्हणूनच त्याची साडेसाती महाराष्ट्राला लागली हें यांच्या स्वप्नींही वसत नाहीं !

**जिजाऊः**—वडिलांनीं असा हा देशोच्छेदाचा विपरीत मार्ग धरल्यामुळें मोठाच अनर्थ उद्भवणार असें दिसतें. काय करायचें ! महाराज, वडिलांशीं आणखी एकदां समेट करून घेण्याचा यत्न नाहीं का करतां येण्यासारखा !

**शहाजीः**—होय. त्यांची एकदां मुद्दाम समक्ष भेट घेऊन सर्व गोष्टी बोलून टाकायच्या, एवढा मात्र एक यत्न राहिला आहे. आणि तो सुद्धां मी लवकरच करून पाहणार आहें.

**जिजाऊः**—हो ! पण ही चर्चा निघाली त्यांत आजची एक महत्त्वाची आणि अतिशय आनंदाची गोष्ट मला सांगायची होती ती तशीच राहिली.

**शहाजीः**—( उत्सुकतेनें ) महत्त्वाची आणि आनंदाची गोष्ट ! सांगा, सांगा कोणती गोष्ट ती !

**जिजाऊः**—आज उजाडतां उजाडतां मला स्वप्नांत देवीचें दर्शन झालें !

**शहाजीः**—काय म्हणतां ! प्रत्यक्ष देवीचें दर्शन ?

**जिजाऊः**—होय. होय. प्रत्यक्ष देवीचें दर्शन ! अहाहा ! काय तें तिचें अतिसुंदर ध्यान ! त्याचें स्मरण झालें म्हणजे अजून सुद्धां अंगावर आनंदाचे रोमांच थरारतात !

**शहाजीः**—उजाडतां उजाडतां जीं स्वप्नें पडतात त्यांचा फलादेश तत्काल होतो हा नेहमींचा अनुभव आहे. देवीचें ध्यान कसें कसें तुम्हांला दिसलें तें सांगा पाहूं.

**जिजाऊः**—ज्या सुंदरपणाला त्रिभुवनांत तुलनाच नाहीं त्याचें वर्णन मी तरी काय करणार ? तिच्या शरीराभोंवतीं तेज पसरलें होतें त्याकडे पाहिलें म्हणजे डोळे दिपून जात ! आणि वाटे कीं, देवीच्या अंगावर हिऱ्यामोत्यांचे दागिने झळकत आहेत त्यांच्याच प्रकाशाचा हा लखलखाट नसेल ना ? अथवा तिनें शुभ्रवस्त्रें परिधान केलीं आहेत तीं विजेच्या तंतूंनीं विणलीं असावीं, आणि त्यांचाच हा

देदीप्यमान प्रकाश असावा ! अथवा तिच्या कोमल हास्याचें तें चांदणेंच फांकलें असावें ! तिच्या मुखचंद्राकडे जरी मला टक लावून बघवलें नाहीं, तरी ती मजकडे प्रेमळ व प्रसन्न दृष्टीनें पहात आहे हें माझ्या लक्षांत येत होतें, आणि त्यामुळें अंगावर अमृताचा वर्षाव होत असल्याचा भास होत होता ! वाचा कशी ती मला फुटेचना ! तरी त्यांतून सुद्धां तिला कांहीं विचारावें असा मनाचा हिय्या केला. तों " थांब " अशी तिनें हातानें खूण केली, व तुला फळ आणून देतें असें बोलून ती अंतर्धान पावली ! त्याबरोबर मीं जागी होऊन डोळे उघडले तों फटफटीत उजाडलेलें !

**शहाजीः**—तुम्ही म्हणतां हें स्वप्न अद्भुत असून तें आमचा भाग्योदय समीप आला असें सुचवीत आहे यांत संशय नाही. ही स्वप्नाची वार्ता तुम्ही म्हणालांत त्याप्रमाणें खरोखरच अत्यानंदाची आहे.

**जिजाऊः**—आणखी सांगायची गोष्ट म्हटली, तर सकाळपासून माझी डावी भुजा आणि डावा डोळा राहून राहून स्फुरण पावतो आहे. तेव्हां म्हणतें, माझें हें स्वप्न आजच कांहीं तरी प्रचीत दाखवणार !

**शहाजीः**—मलाही सकाळपासून उत्तम शकुन होत आहेत. तुम्हाला पडलेलें स्वप्न आणि हे शकुन कोणच्या लाभाचे सूचक असावेत बरें !

**जिजाऊः**—( हंसत ) हाच प्रश्न मी पुराणिकबोवांना विचारला. त्यांनीं सांगितलें कीं यापासून तुम्हांला सौख्यभोग व अपार वैभव प्राप्त होईल आणि इकडे लौकरच वजीरीचा अधिकार मिळेल !

**शहाजीः**—वैभव, सौख्यभोग आणि वजिरीचा अधिकार ! त्यांची महती कोण मानतो ? बापाच्या लहरींपासून जिने लहरी स्वभाव घेतला ती चंचल लक्ष्मी ! तिच्या पाठीस कोण लागला आहे ? केवळ इंद्रियार्थांची तृप्ति करणारे पण वस्तुतः रोगांचें आगमन सुचविणारे जणूं काय त्यांचे भालदारच, असे ते तुच्छ विषयभोग ! त्यांचा कोणाला हव्यास आहे ? जिथें मुळीं सुलतानाच्याच अधिकाराची शाश्वती नाहीं, तेथें वजिरीच्या अधिकाराला काय किंमत आहे ? जिथें मुळीं देवच देव्हाऱ्यांत रहाण्याची भ्रांति, तिथें पुजाऱ्याची वतनदारी कशी चालेल ? राणीसाहेब, हें निजामशाही राज्य आतां फार दिवस टिकणार नाहीं. मोंगलाईचें ग्रहण याला एव्हांपासूनच लागलें आहे. या राज्याचे सरदार, अधिकारी व महाजन मोंगल बादशहाच्या मोहिनीमंत्रानें कर्तव्यमूढ झाले आहेत. मलिकंबरानें मरते वेळीं या

सुलतानाचा हात माझ्या हातांत दिला, त्यामुळें इमानाला जागून मी त्याची नोकरी दक्षतेनें करतों आहें. एरवीं हा सुलतान कोणाही सरदाराला नकोच आहे! खरोखर, हल्लींचा सुलतान हा निजामशाहीचा शेवटचा सुलतान होईल, त्यानंतर हें राज्य नाश पावेल, असें या सुलतानाच्या जन्मकाळींच कोणी ज्योतिषानें भविष्य वर्तविलें आहे तेंच दुर्दैवानें खरें ठरणार, ही माझी खात्री होऊन चुकली आहे. तसें झालें म्हणजे चोहोंकडे मोंगलाई अमलाचा जुलूम सुरू होऊन प्रजेला जीवन्मृताच्या विपत्ति भोगणें प्राप्त आहे! हा सर्वव्यापी अनर्थ जर चुकवावयाचा असेल तर आपलेंच असें निराळें स्वतंत्र मराठी राज्य निर्माण करण्याच्या उद्योगाला एव्हांपासून लागलें पाहिजे. त्याकरतां मराठ्यांची बुद्धि व पराक्रम एकत्र करून त्यांचा ओघ या कार्याकडे वळवला पाहिजे. एकंदर मराठमंडळांत आत्मविश्वास, साहसाची प्रीति व दृढनिश्चय हीं उत्पन्न केलीं पाहिजेत. तुझ्या कुळांत राज्यसंस्थापक अवतारी पुरुष उत्पन्न होईल असा देवीनें मालोजी राजांना वर दिलेला आहे तो राज्यसंस्थापक प्रकट होण्याची वेळ हीच आहे. तुम्हांला पडलेलें स्वप्न जर त्याच्या अवताराचें सूचक असेल तरच महाराष्ट्राचा तरणोपाय आहे, आणि त्यांतच आमचें परम कल्याण आहे. पुराणीकबोवांनीं सांगितलेला फलादेश एखाद्या स्वार्थलंपट माणसाला संतोषी करील, पण महाराष्ट्राची दैन्यावस्था कशी चुकेल या योजनेत व्यग्र झालेला जो मी, त्या मला हे कुटुंबकल्याणाचे विचार रुचत नाहींत! राणीसाहेब, तुमच्या स्वप्नामुळें कुटुंबकल्याणाचा केवढाही वर्षाव माझ्यावर झाला तरी त्यानें माझी देशकल्याणाची तळमळ शांत होणार नाहीं. ती तळमळ शांत करायला समर्थ असा वीर कोण—

( पडद्यांत शब्द होतोः—" रघुवीर समर्थ ! " )

**शहाजीः**—रघुवीर समर्थ! होय. तें तर खरेंच आहे! या त्रिकालाबाधित सत्याचें कोण बरें आपल्या गंभीर वाणीनें मला स्मरण देत आहे? ( पाहून ) राणीसाहेब, पहा, पहा हा चमत्कार! ज्यांना पाहिल्याबरोबर कोणाच्याही मनांत पराकाष्ठेचा पूज्यभाव उत्पन्न व्हावा असे हे कोणी तपस्तेजानें शोभायमान बालब्रह्मचारी थेट आम्ही बसलों आहों येथेंच येत आहेत!!!

**जिजाऊः**—( घाबरून ) आम्ही एकांतांत बोलत असतां इथे ते ब्रह्मचारी येताहेत म्हणायचें? काय बाई ही फजिती! आतां कसें करावें? मी जातें या दारानें पळून! ( जाऊं लागते. )

**शहाजी:**—( थांबवून ) अशा गोऱ्यामोऱ्या होऊं नका, आणि इथून जाऊं नका! भगवद्भक्तांनीं आपण होऊन आम्हांवर पायधूळ झाडावी एवढी पुण्याई आमची खचित नाहीं. इतकें असून ते कृपाळूपणानें आम्हांला दर्शन देण्याकरितां येतात, आणि आम्हीं पळून जावें हा कोठचा वेडेपणा? भिऊं नका, स्वस्थ असा.

( खाकेस झोळी, खांद्यावर गलोल, व हातांत कुबडी अशा वेषानें स्वामी येतात. शहाजी व जिजाऊ त्यांस वंदन करतात. जिजाऊ आसन आणून देते. तें शहाजी भूमीवर मांडतो. )

**शहाजी:**—स्वामीमहाराज, या आसनावर बसावें.

**स्वामी:**—राजा, जिजाऊ, तुमचें धर्माचरण आणि ऐश्वर्य उत्तरोत्तर वर्धमान होवो! आम्ही बसत नाहीं. आणि तुमचाही कालक्षेप करीत नाहीं. शककर्ता छत्रपति तुझ्या कुळांत जन्मास येईल असा देवीनें मालोजीराजाला वर दिला होता, त्याप्रमाणें तो कुलदीप छत्रपति तुमच्या उदरीं उत्पन्न होण्याचा समय येऊन ठेपला आहे. राजा, जिजाऊला देवीनें जें फळ देतें म्हणून सांगितलें ( शहाजी व जिजाऊ चपापतात. ) तें हें फळ घे! ( झोळींतून श्रीफल काढून देतात. ) ( शहाजी तें फळ ओंजळींत घेतो व जिजाऊच्या ओटींत टाकतो. शहाजी व जिजाऊ स्वामीस वंदन करतात. ) आज पूजेच्या वेळीं हेंच फळ तुम्हीं श्रीस अर्पण करा व तिचा प्रसाद म्हणून याचा स्वीकार करून हें भक्षण करा; म्हणजे तुम्हांला पुत्र होईल. तो पुत्र छत्रसिंहासनाधीश्वर सार्वभौम राजा होईल आणि त्याच्या कीर्तीचें कौतुक अनंत कालपर्यंत हें भूमंडळ करीत राहील!

**शहाजी:**—स्वामिन्, या अनुग्रहाबद्दल आम्ही किती ऋणी आहों हें बोलून दाखवायला जावें तर वाचेची गति कुंठित होते! हेंच कृपेचें छत्र आम्हांवर व आमच्या पुत्रांवर नेहमीं असावें हेंच मागणें आहे. आम्हांवर मोठीं दुर्घट संकटें यंदां ओढवूं पहात आहेत; त्यांतून आमचें रक्षण करायला समर्थांखेरीज कोण समर्थ आहे?

**स्वामी:**—राजा! आम्ही तुमच्या कुळाविषयीं अनास्था करूं हें कसें घडेल? आमचें उपास्य दैवत रामचंद्र आहे, तरी रामवरदायिनी जगदंबेचे आम्ही तुम्हां-प्रमाणें उपासक आहोंच. त्यामुळें तुमचा योगक्षेम कसा चालतो इकडे आमचें अवधान सदोदित असतें. दुसरी गोष्ट अशी कीं, यद्यपि आम्ही प्रपंचाचा त्याग

करणारे विरक्त तपस्वी आहों, तथापि विश्वकुटुंबाचा प्रपंच पहाण्याविषयीं आम्हाला भगवंताची आज्ञाच आहे. महाराष्ट्रधर्माचा संप्रदाय वाढविणाऱ्या छत्रपतीचा जन्म हा विश्वकुटुंबाच्या प्रपंचापैकीं महत्वाचा प्रसंग आहे हें आम्ही जाणतों. तुमच्या संकटाचें निवारण जेव्हां जेव्हां अन्य उपायानें होण्याजोगें नसेल, तेव्हां तेव्हां तें आम्ही अवश्य करूं. आम्ही निरोप घेतों आतां.

**शहाजी:**—स्वामिन् ! पूजा घेतल्याशिवाय आपणाला आम्हीं जाऊं दिलें तर आपला अनादर केल्यासारखें होतें.

**स्वामी:**—तुमचें सौजन्य, विनय आणि भक्ति यांनींच आमची सर्व पूजा होऊन चुकली आहे ! ( दोघें वंदन करतात व स्वामी जातात. )

**जिजाऊ:**—महाराज ! केवढा हा आजचा आनंद !

**शहाजी:**—होय होय ! देवीची कृपा आणि साधूचें दर्शन हे या संसारांतले परम दुर्लभ लाभ होत. आणि त्यांतही या लाभांनीं आम्हांला जें अत्यंत इष्ट होतें तेंच कल्याण आमच्या पदरांत आणून घातलें. त्यामुळें मला झालेल्या आनंदाला पारावारच नाहीं. बरें, पण हे महापुरुष आम्हांपर्यंत एकदम येऊन पोंचले हें घडलें कसें ? पहारेवाल्यांनीं यांना आडकाठी केली नाहीं हें उत्तमच केलें, पण हे स्वामी आम्हांकडे येत असल्याची वर्दी त्यांनीं आम्हांला द्यायला पाहिजे होती कीं नाहीं ? रायबा ! ( रायबा लगबगीनें येतो. )

**रायबा:**—जी सरकार !

**जिजाऊ:**—अरे, आतां इथे स्वामी आले होते ते येण्यापूर्वी तूं कसें नाहीं आम्हांला कळवलेंस ?

**रायबा:**—स्वामी ? कुठले स्वामी ? आणि कुणीकडून इथे येतील ते ?

**शहाजी:**—काय ? आतां आलेले स्वामी तूं पाहिले नाहींस ? त्यांचें बोलणेंही ऐकलें नाहींस ?

**रायबा:**—नाहींबा ! स्वामी, गोसावी, फकीर, कोणी आलें नाहीं, गेलें नाहीं ! आणि बोलणार कुठून ?

**शहाजी:**—बरें, पहाऱ्यावर जाऊन चौकशी कर म्हणजे कोण स्वामी, केव्हां आले, हें तुला आपोआप कळेल. ( रायबा जातो. ) राणीसाहेब, पाहिलात ना हा

दैवी चमत्कार ? स्वामी आले, गेले, बोलले हें आम्हां दोघांखेरीज कोणाला ठाऊक सुद्धां नाहीं !!!

**रायबा:**—( येतो. ) पाहरेवालेसुद्धां म्हणतात स्वामी संन्याशी कोणी आला नाहीं आणि गेला नाहीं !

**शहाजी:**—बरें. जा तूं. ( रायबा जातो. )

**जिजाऊ:**—सत्पुरुषांच्या लीला अगाध अचिंत्य आहेत ! आम्हां पामरांना त्यांचा अंत कसा लागेल ?

**शहाजी:**—चला आतां पूजेच्या तयारीला लागूं. पण आमचे छोटे राजे आज कुठे दिसले नाहींत हें कसें काय ?

**जिजाऊ:**—आज मी विचारांत इतकी गर्क झालें होतें कीं सकाळपासून त्या बिचाऱ्याची कांहींच चौकशी करायचें मला सुचलें नाहीं !

**शहाजी:**—आणि तोही बहादर साऱ्या दिवसांत जवळ बोलावला नाहीं तर तुम्हांकडे ढुंकूनसुद्धां बघायचा नाहीं ! नेहमीं आपल्याच खेळांत दंग ! रायबा ! ( रायबा येतो. )

**रायबा:**—( हंसत ) गवसले का स्वामी ?

**शहाजी:**—( हंसत ) गवसले ! संभाजीराजे काय करताहेत तेवढें पाहून ये बरें !

**रायबा:**—तें मला ठाऊक आहे. धाकटे राजे पागेच्या सदरेवर तिरंदाजी शिकताहेत.

**जिजाऊ:**—( कौतुकानें ) महाराज, चिरंजीव चौथें वर्ष लागलें नाहीं तों तिरंदाजी शिकूं लागले !

**शहाजी:**—( हंसत ) शिकण्याची फारच घाई करताहेत, तेव्हां मोंगलांची कमूबक्तीच आली म्हणायची ! ( जातात. )

---

# प्रवेश २ रा.

स्थळ:—सिंदखेड. जाधवरावांचा वाडा.

( जाधवराव व म्हाळसाबाई बोलत आहेत. )

**म्हाळसा:**—हें ऐकलें का? आज म्हणे दौलताबादेहून जांवई मुद्दाम भेटायला येताहेत!

**जाधव०:**—होय. त्यांच्या चिठीवरून पाहिलें तर ते इतक्यांतच इथे येऊन पोंचावे.

**म्हाळसा:**—अलीकडे आम्हांशीं त्यांचें मुळींच पटेमासें झालें, त्यामुळें इकडे जाणें येणें त्यांनी अगदींच टाकलें. आणि जिजीला चार दिवस माहेराकरितां आणीन म्हटलें तर तिचें नांवसुद्धां काढलेलें इथे खपत नाहीं! इतकें असून शहाजी राजे आज न बोलावतां मुद्दाम भेटायला येतात, याचें काय बरें कारण असेल!

**जाधव०:**—( स्वगत ) कारण बिरण सारें मला माहीत आहे! पण तें तुला सांगून काय करायचें? ( उघड ) मलासुद्धां तर्क होत नाहीं. भेट झाल्यावर काय कारण तें समजेलच!

**म्हाळसा:**—कारण कोणचेंही असो. जांवई कधीं न येणारे ते दैवयोगानें आज माझ्या दृष्टीस पडताहेत. त्यांचें मन दुखवायचें नाहीं बरें का? नाहीं तर मागच्या उखाळ्यापाखाळ्या निघतील, आणि कडू बोलून त्यांच्या मनाचा विरस करायचा होईल; म्हणून आधींच सुचवून ठेवतें आहें. त्यांच्याशीं गोड बोललें, गोड वागलें, ते जातांना खूप मर्जींत गेले, म्हणजे भारी भारी गोड दिसेल. नाहीं बरें?

**जाधव०:**—त्यांच्या भेटीचें कांहीं लौकिक कारण असेल तर गोड बोलायला माझें काय जातें? राजकारणासारखी नाजूक गोष्ट असेल तर त्याचें मात्र कसें काय बनेल तें सांगवत नाहीं.

**म्हाळसा:**—मी म्हणतें, आतां आमचें सर्व राजकारण मुलगी आणि जांवई यांचें कल्याण करण्याचा हव्यास एवढेंच काय तें असावें. दुसरें राजकारण आपल्याला पाहिजे कशाला?

**जाधव०:**—( स्वगत ) बायकांचें राजकारण फार सोपें ! आपला सरळ धोपट रस्ता ! होतां होईल तों जावयाचें घर भरायचें आणि त्याचें कल्याण करायचें ! मग त्यांत आपल्या घराचें गरगरीत वाटोळें झालें तरी चिंता नाहीं !

**म्हाळसा:**—सोन्यासारखी मुलगी आणि रत्नासारखा जांवई ! त्यांच्याशीं दावा साधायची हांव धरणें आतां या वयांत चांगलें दिसत नाहीं, असें माझ्या तर बुद्धीला वाटतें. लोक याबद्दल चर्चा करतात तीं कानांनीं ऐकवतसुद्धां नाहीं. मी पदर पसरून विनवणी करतें एवढी आजच्या दिवस ऐकावी. आज कांहीं जांवयांना हिरमुसल्या तोंडानें जाऊं देऊं नये !

**जाधव०:**—( स्वगत ) काय बायकांची वेडी समजूत ! ( उघड ) बरें बरें तुम्ही म्हणतां तर तसेंच वागूं. झालेंना ? आणखी काय म्हणणें ?

**म्हाळसा:**—आणखी आज त्यांना राहून घेतलें पाहिजे. निदान जेवायला तरी रहा म्हणावें. आपण तसाच आग्रह केला तर ते कांहीं नाहीं म्हणायचे नाहींत ! मी मेजवानीची सारी झटपट तयारी करतें, आणि स्वतः सूचना द्यायला येतें.

**जाधव०:**—( हंसत ) जांवयांना मेजवानी. मग सासूबाईची धांदल काय विचारावी ! जा, जा तर लौकर. पलीकडून कांहीं गडबड ऐकूं येते आहे त्यावरून शहाजीराजे आलेच वाटतें. करा मेजवानीची तयारी ! जा ! ( म्हाळसाबाई जाते. ) येऊं दे, येऊं दे आतां जांवई ! मीच त्याला खाशी खरपूस मेजवानी देतों ! निंबाळकरांच्या मध्यस्थीला ज्यानें जुमानलें नाहीं, तो असल्या पोरांच्या दरडावणीला थोडाच भीक घालणार आहे ! ( पाहून ) आलाच तो ! ( शहाजी येतो ) यावें. यावें राजेसाहेब ! अलभ्य लाभ ! अलभ्य लाभ ! ! ( शहाजी पायांवर डोकें ठेवतो.) शतायु व्हा ! चिरंजीव व्हा !

**शहाजी:**—विजयी व्हा, कीर्तिमान् व्हा, धर्माचे उद्धारक व्हा, महाराष्ट्राचे बंधमोचक व्हा, असा आशीर्वाद मागण्यासाठीं मामासाहेब मी आपणाकडे आलों आहें. स्वजनाचे द्रोही शंभर किंवा हजार वर्षे वांचले तरी काय करायचे ?

**जाधव०:**—( स्वगत ) यानें पहिल्याच सलामींत माझ्या म्हातारपणाला उद्देशून चांगलाच टोमणा मारला ! ( उघड ) राष्ट्राचे उद्धारक आणि धर्माचे बंधमोचक वगैरे काय तुम्ही म्हणतां तें स्वतःच्या कर्तृत्वावर होण्याचें तुम्हीं ठरवलेंच

आहे. आम्हांला कधीं तुम्हीं त्यांत विचारलें आहे ? तसला आशीर्वाद तुम्हांला देण्यापासून आतां कांहीं विशेष लाभ व्हायचा राहिला आहे अशांतला प्रकार नाहीं. आज आपलें आगमन इकडे होण्याचें प्रयोजन कोणतें हें कळवण्याची तसदी घ्याल काय ?

**शहाजीः**—आधीं एक दोन गोष्टींचा खुलासा आपणाकडून प्रांजलपणानें झाला पाहिजे. तो झाल्यावर काय विनंति करायची ती करतों.

**जाधव०:**—खुशाल विचारा काय तें ! जी जी हकीगत मला माहीत असेल ती ती मोकळ्या मनानें कळवतों.

**शहाजीः**—शहाजहान बादशहाच्या हुकमावरून कोणी इसामिय्या नांवाचा सरदार मुद्दाम निजामशाहीचा बंदोबस्त करण्यासाठीं दक्षिणेंत येतो आहे अशी दाट बातमी पसरली आहे, ती खरी आहे काय ?

**जाधव०:**—होय. ती गोष्ट खरी आहे. निजामशाही राज्य हें मोंगलसरकारच्या ताबेदारीखालचें राज्य असून तेथला वजीर फत्तेखान व इतर उमराव अधिकारी मोंगलसरकारानें नेमिले आहेत. आणि त्यांच्या तंत्रानें सुलतान मूर्तिजा निजामशहानें वागावें असें ठरलेलें आहे. तुम्ही त्या राज्यांतले नामांकित सरदार. मोंगलबादशहानीं ठरवून दिलेली व्यवस्था शिरसा मान्य करून त्याप्रमाणें चालावें हेंच तुमच्या एकनिष्ठतेच्या लौकिकाला उचित होतें. असें असतां तुम्ही विपरीत बुद्धि धरून मराठ्यांचे जमाव करून मुलखांत दंगेधोपे माजवतां, मोंगल सरकारची ताबेदारी झुगारून देण्याची दुर्बुद्धि सुलतानाला शिकवतां, फत्तेखान वजीर वगैरे अधिकाऱ्यांशीं सुलतानाचें वांकडें पाडून राज्याच्या वजीरीवर आपलीच नेमणूक करून घ्यावी अशी इच्छा धरतां, हे तुमच्या बदफैली वर्तनाचे बोभाटे दिल्लीस बादशहांच्या कानावर जाऊन धडकले; आणि त्यांनीं तुमचें बंड मोडण्याकरितां मुबलक फौज बरोबर देऊन इसामिय्याची रवानगी इकडे केली आहे. ते इसामिय्या बऱ्हाणपुरास फौज ठेवून माझ्या भेटीकरितां पुढें आले आहेत. एक दोन दिवसांत त्यांची माझी भेट होईल. मला स्वतःला बादशहांचा हुकूम असा आला आहे कीं, इसामिय्याची कुमक करून तुमचें बंड मोडावें, आणि तुमचें पारिपत्य करावें.

**शहाजीः**—आणि याप्रमाणें आपण करणार ?

**जाधव०:**—हें काय विचारावें ? बादशहांचा हुकूम ! तो अमलांत आणणें मला प्राप्त आहे.

**शहाजी:**—मोंगलसरकारची ताबेदारी मलिकंबर वजीरांनीं कधीं कबूल केली नाहीं इतकेंच नव्हे, तर उलट त्या सरकाराशीं मरेपर्यंत युद्ध करून निजामशाहीचें स्वातंत्र्य कायम राखलें, आणि महाराष्ट्राचा बचाव केला. मी त्या जगद्विख्यात वजीराचा चेला म्हणवतों. त्यानेंच आम्हां भोंसल्यांचें घराणें नांवारूपाला आणलें.

**जाधव०:**—( स्वगत ) आणि आमचें नांवरूप नष्ट केलें ! जळो त्याचें नांव !

**शहाजी:**—मोंगलांशीं लढाई करून निजामशाहीचें स्वातंत्र्य राखणें आणि महाराष्ट्राचा बचाव करणें, हें मलिकंबराचें व्रत पुढें चालवणें मला भाग आहे. आणि वाटेल तो स्वार्थत्याग करून मी तें चालवणार. मग त्या कामांत मोंगल मला बंडखोर म्हणोत कीं कांहीं म्हणोत ! मला त्याची पर्वा नाहीं. आतां सुलतान मूर्तिजा निजामशहाविषयीं म्हणाल, तर आपण म्हणतां ही मोंगलांची ताबेदारी त्यांनींही कधीं मान्य केलेली नाहीं. उगीच ही ताबेदारीची कल्पना मोंगलबादशहानें आपल्याच मनानें बसवून आमच्या राज्यांतल्या फत्तेखान वगैरे अधिकाऱ्यांत फितूर करून या कल्पनेचा अम्मल सुरू केला आहे. आपल्या फायद्यासाठीं मोंगलांनीं बिचाऱ्या निजामशहावर हें ताबेदारीचें खोगीर लादलें आहे, आणि माझें शासन करण्याच्या निमित्तानें निजामशाहीवर हें इसामिय्याच्या स्वारीचें काहूर उठवलें आहे. हें सर्व जाणून संवरून आपण या मसलतींत सामील होणार कीं काय !

**जाधव०:**—अलबत होणार ! हें काय विचारावें ! जर आम्हीं मोंगल बादशहांची जहागीर खातों तर त्यांच्या आज्ञेप्रमाणें नको वागायला ?

**शहाजी:**—पण आपली जहागीर मूळची निजामशहाची देणगी आहे. तीच जहागीर मोंगलबादशहानें आपणाकडे कायम करून फुकाचा उपकार करून दाखवला ! पदरचें नवीन असें कांहींच दिलें नाहीं ! आणि एवढ्याशा फुकाच्या देणगीवर खूष होऊन आपण आपल्या जातभाईवर हत्यार उपसणार ?

**जाधव०:**—न उपसून कसें चालेल ? तसें न करीन तर उद्यां मोंगल माझी जहागीर घेऊन मला भिकेला लावतील. जहागीरही लहानसान नव्हे. तीस लक्षांची जहागीर ! ही जहागीर मूळची निजामशहाची देणगी असली तरी हल्लीं ती मला मोंगलबादशहांच्या कृपेमुळेंच भोगायला सांपडते आहे, याबद्दल मी कृतज्ञता

वागवली पाहिजे. जर त्या बादशहांचा मला आश्रय नसता तर तुम्हीं भोंसल्यांनीं मला कधींच देशोधडीला लावलें असतें हें मीं जाणलें पाहिजे! शिवाय मोंगलांची कुमक केल्यामुळें माझा एक फारच मोठा फायदा होणार आहे. तो फायदा हाच कीं, तुमचें पारिपत्य होऊन निजामशाहींत स्वस्थता झाल्यावर पुन्हां तेथें मराठ्यांचें बंड उद्भवूं नये म्हणून त्या राज्याचा बंदोबस्त व देखरेख माझ्यावर सोंपवण्याचें मोंगल बादशहांनीं योजिलें आहे. म्हणजे पर्यायानें सर्व निजामशाही राज्य मोंगलबादशहा मला देणार! पूर्वीं ज्या देवगिरींत यादवराजे राज्य करीत होते त्याच देवगिरींत म्हणजे दौलताबादेंत आम्हां जाधवरावांचें राज्य चालू झाल्यावर तुम्ही भोंसले महाराष्ट्राच्या कोणच्या कोनाकोपऱ्यांत जाऊन पडाल त्याची विचारपूस सुद्धां कोणी करणार नाहीं! मराठमंडळांत अग्रपूजेचा मान मिळण्यासाठीं वेरूळच्या भोंसल्यांनीं गेलीं पंचवीस वर्षे फार धडपड केली; आणि आमचा तेजोभंग करून आम्हांला निजामशाही राज्यांतून काढून लावलें. पण आतां मोंगलांच्या पाठबळावर जेव्हां आम्हीं सिंदखेडचे जाधव देवगिरीच्या तक्तावर विराजमान होऊं तेव्हां तरी अग्रपूजेचा मान आमचा आम्हांला मिळेल कीं नाहीं? कीं भोसले आम्हांवर श्रेष्ठता मिळवण्यासाठीं निराळ्याच एखाद्या राज्याची स्थापना करणार आहेत?

**शहाजीः—** ( स्वगत ) भोंसल्यांवर जगन्मातेची कृपा असेल तर ते निराळ्या राज्याची स्थापनाही करतील! त्यांत काय संशय आहे? ( उघड ) मामासाहेब, आपण सांगतां या गोष्टी मीं पूर्वीच ऐकलेल्या आहेत. मात्र त्यांच्या खरेपणाबद्दल आजपर्यंत खात्री वाटत नव्हती.

**जाधव०:—** आतां खात्री झाली ना? हें सारें तुम्हांला कळवण्यांत माझा हेतु तरी एवढाच आहे कीं, तुम्हीं स्वतःला कोणत्या संकटांत पाडून घेत आहां याचें यथास्थित ज्ञान तुम्हांला व्हावें.

**शहाजीः—** पण स्वतःच्या कृतीनें महाराष्ट्राला आपण कोणत्या संकटांत पाडीत आहां, याचें आपल्याला तरी ज्ञान आहे काय? मामासाहेब, एका मराठ्याला हातीं धरून राबवून परभारें त्याच्याच हातानें बाकीच्या मराठ्यांचा नायनाट करावा, हा मोंगलाई–कावा आपल्या लक्षांत कसा येत नाहीं? भोंसल्यांचा उच्छेद आपल्या हातून करवल्यावर सुलतानाचें एवढें मोठें राज्य मोंगल आपल्या हातीं राहूं देतील ही भ्रांति धरूं नका! आपली जहागीर सुद्धां ते आपणाला खाऊं देणार नाहींत.

मग देवगिरीच्या यादवांचें वैभव भोगण्याची गोष्ट दूरच राहिली! या स्वप्नांतून जागे व्हा! सावध व्हा! आधीं स्वजनांचा आणि मागून स्वतःचा नाश करून घेऊन शत्रूचें कल्याण साधून द्यावें, हा विचार आपणासारख्या ज्ञानी वृद्धाला शोभत नाहीं! माझी विनंती आपणाला अशी आहे कीं, इसामिय्या येऊन भेटला नाहीं तोंच आपण मराठमंडळांत येऊन सामील व्हावें; आणि पूर्वीप्रमाणें सुलतानाची चाकरी पतकरून त्याचें राज्य जतन करावें. आपण आणि आम्ही सारे एक झालों म्हणजे मोंगल कसा काय पुढें चालून येतो तें पाहून घेऊं!

**जाधव०:**—बस् बस्! मोंगल बादशहांशीं बेइमानी करण्याची गोष्ट तुम्ही माझ्यासमोर काढूं नये. त्यांच्या पायांवर वाहिलेली माझी तरवार जर लढाईकरतां उपसली जाईल, तर ती त्यांच्याच कामावर उपसली जाईल, त्यांच्या सद्धेतुविषयीं मला तिलप्राय शंका कधीं येत नाहीं. माझें कल्याण करण्याचा इरादा त्यांनीं धरला आहे याबद्दल मी स्वतःला धन्य समजतों! वडिलांच्या नात्यानें तुम्हांला एखादी उपदेशाची गोष्ट सांगणें माझें काम आहे. मग ती गोष्ट तुम्ही ऐका अगर न ऐका!

**शहाजी:**—कोणची गोष्ट म्हणतां?

**जाधव०:**—ती गोष्ट हीच कीं, तुम्हीं बंडाचा फैलावा करून चार दिवस भालेराई गाजवण्याचा विचार योजला आहे याचा परिणाम सुधा नाहीं. तुम्हांला आणि तुमच्या सुलतानाला मोंगलांचा द्वेष करायचें तेवढें मलिकंबरानें शिकवलें, पण त्यानें आपलें नशीब तुम्हांला दिलें नाहीं! त्याचें कर्म तुम्ही करूं जाल तर तें तुम्हांला साधायचें नाहीं. तुम्ही खचित नाश पावाल. याकरतां यापुढें तरी हा मार्ग सोडून मोंगल बादशहांना शरण या; आणि त्यांची चाकरी पतकरून ती एकनिष्ठेनें करून दाखवा, म्हणजे तुमच्या कर्तृत्वाचें उत्तम प्रकारें चीज होऊन तुम्ही मोठ्या योग्यतेला चढाल.

**शहाजी:**—शिव शिव! शत्रूची चाकरी करून आपल्याच हातानें मायभूमीच्या पायांत पारतंत्र्याची शृंखला घालण्याचा अधमपणा मी कधीं करणार नाहीं. आणि मामासाहेब, मी हात जोडून प्रार्थना करितों कीं, आपण सुद्धां या अघोर पापाचे धनी होऊं नये! शत्रूच्या सद्धेतुविषयीं आपणाला तिलप्राय शंका येत नाहीं, आणि आम्हांपेक्षां आप्तसोयरे आपणाला कोणी नसतां आमच्या हेतूची मात्र शंका येते, याला म्हणावें तरी काय? आपणाला आम्हांकडे ओढण्यांत मला कांहीं खासगत फायदा करून घ्यायचा आहे असें आपण कां मानतां?

**जाधव०:**—कां मानूं नये ? जाधवरावाचा स्नेह भोसल्यांना पाहिजे तो स्वतःचा टेंभा पाजळण्याकरितां पाहिजे आहे, असें मला तर स्पष्ट दिसतें आहे.

**शहाजी:**—नाहीं नाहीं ! समाजकल्याणाखेरीज यांत माझा कोणताही हेतु नाहीं. आपला स्नेह जोडण्यांत मला स्वतःचा कांहीं एक फायदा करून घ्यावयाचा नाहीं. उलट आपण सांगाल तो स्वार्थ गमावायला मी तयार आहें ! शत्रूचा पक्ष आपण सोडाल तर अशी कोणती गोष्ट आहे कीं, जी मी आपणाला प्राप्त करून देणार नाहीं ! आपली जहागीर मोंगल घेईल म्हणून भय मानाल तर आम्ही सर्व एक झालों म्हणजे आपल्या वाटेला जाण्याची मोंगलाची काय प्राज्ञा आहे ? मी सुलतानाचा वजीर होईन, आणि आपल्या तेजाला मालिन्य येईल, असें भय असेल तर आपणच वजीर होऊन राज्य संभाळा ! ! माझी हरकत नाहीं. मराठ्यांचें नेतृत्व मीं संपादन केलें याबद्दल मत्सर वाटत असेल, तर आपणच आमच्या समाजाचे अग्रणी व्हा ! मी आपला आज्ञाधारक होऊन सांगाल तसें वागेन. जाधव-भोंसल्यांनीं एकमेकांवर चढाओढ करण्याची झटपट आजपर्यंत केली ती पुरे झाली ! माझ्या कुळाचा अभिमान मला आहे, माझ्या पराक्रमाचा अभिमान मला आहे, परंतु एका देशप्रेमाच्या पायीं मी सर्व प्रकारच्या अभिमानांवर पाणी सोडायला तयार झालों आहें.

**जाधव०:**—पण मी स्वार्थावर पाणी सोडून फकीर बनायला अजून तयार झालों नाहीं ! जगाची रहाटी ओळखणारा मी एक साधा सीधा शिपाई गडी आहें. माझ्या कुळाचा दरारा, वैभव आणि प्रतिष्ठा ज्या साधनांनीं वर्धमान होण्याजोगीं आहेत तीं साधनें मला सर्वोपरी अनुकूल असतां तीं हातचीं गमावून सुखाचा जीव दुःखांत घालण्याचें आणि तुम्हांबरोबर भटक्या मारीत फिरण्याचें मला कांहीं एक प्रयोजन नाहीं ! स्वार्थत्याग, देशप्रेम, समाजकल्याण इत्यादि शब्दांचे ध्वनि माझ्या हृदयाकाशांत उमटत नाहींत ! माझ्या कल्पनाशक्तीला इतक्या उंच भराऱ्या मारवत नाहींत !

**शहाजी:**—समाजकल्याण, देशप्रेम हे शब्द आपणाला समजत नसतील तर न समजोत, पण पाषाणासारख्या कठोर मनालासुद्धां बलात्कारानें प्रेमाचा ओलावा आणणारा शरीरसंबंध तरी आपण जाणतां कीं नाहीं ?

**जाधव०:**—( उसासा टाकून ) शरीरसंबंध ! मलिकंबरानें माझ्यावर बलात्कार करून माझी मुलगी तुम्हांला देववली, आणि जाधव-भोंसल्यांत मैत्री नांदावी म्हणून कायमचें प्रेमबंधन निर्माण केले. तें बंधन मला प्रेमाचें न होतां उलट

अतिशय दुःखदायक झाले आहे ! ! ! लोहशृंखला हाडामासांत रुतून वेदना उत्पन्न करतात त्याहीपेक्षां अधिक वेदना या कोमल प्रेमबंधनानें माझ्या हृदयाच्या नाजूक मर्मस्थानांत घुसून मला दिल्या आहेत ! यापुढें हें दुःख मी सोसणार नाहीं. याउपर तुम्ही माझे जांवई नाहीं आणि मी तुमचा सासरा नाहीं ! समजलांत ? आतां इथून जितके लौकर जाल तितकें बरें आहे. मला तुमच्या मैत्रीची गरज नाहीं, आणि वैराची पर्वा नाहीं.

**शहाजीः**—हा मी निघून चाललों. म्हातारपणांत क्षुद्र वैभवाचा इतका हावरेपणा, आणि पापी प्रतिष्ठेची एवढी अमर्याद हौस तुमच्या ठिकाणीं पाहून माझें मन तिटकाऱ्यानें विटून गेलें ! मोंगल हे मराठ्यांचे जन्मसिद्ध वैरी आहेत, पण तुमची गोष्ट तशी नव्हती. मी तुम्हांला मैत्री देण्यासाठीं आलों असतां तुम्हीं वैरच पसंत केलें ! उपाय नाहीं.

**जाधव०ः**—होय. होय. मला भोंसल्यांशीं वैर चालवणेंच मानवतें.

**शहाजीः**—फार उत्तम आहे ! तुम्हांला वैर पाहिजे तर त्यालाही माझ्याकडून तयारीच आहे. भीष्मद्रोणादि गुरुजन अर्जुनाला वंद्य असतांही ते धर्मद्वेष्ट्या दुर्योधनाचा आश्रय करून अधर्मयुद्धाला प्रवृत्त झाले म्हणून त्यांवर प्रहार करण्याविषयीं अर्जुनाला ज्यानें बोध केला, तो भगवान् श्रीहरि धर्मद्वेष्ट्या मोंगलांचे मित्र म्हणवणाऱ्या तीर्थस्वरूप जाधवरावांवर तरवार उपसण्याविषयीं मला आज्ञा करीत आहे ! याउप्पर माझ्याकडून तुम्हांला कठोर धिःकार आणि निर्दय शस्त्रप्रहार यांखेरीज कांहीं एक मिळणार नाहीं !

**जाधव०ः**—आणि मलाही तेंच प्रिय आहे. कारण तुम्हांशीं गोड मृदु शब्द बोलायला माझी जिव्हा स्फुरत नाहीं, आणि तुम्हांला आलिंगन द्यायला माझी छाती धजत नाहीं. मात्र युद्धांत तुम्हांवर घाव घालायला वार्धक्यानें जर्जर झालेले हे माझे बाहु वज्रसामर्थ्याचा साक्षात्कार अनुभवीत आहेत ! ! !

( शहाजी जातो तों दुसरीकडून म्हाळसाबाई येते. )

**म्हाळसाः**—झाली मेजवानीची तयारी ! आतां उठायचेंना ? हें काय ? जांवई कोठें गेले ? ( जाधवराव हातानें गेले अशी खूण करितो. ) काय ? निघून गेले ! शेवटीं भांडण झालेंच वाटतें ! एवढें जेवून तरी चला म्हणायचें होतें ! अजून तरी लगबगीनें त्यांच्या पाठोपाठ जाऊन त्यांना घेऊन यायचें करावें.

**जाधव०ः**—होय. होय. आतां त्यांचा पाठलाग करून त्यांना धरून आणायचेंच आहे ! ( पडदा पडतो. )

---

# प्रवेश ३ रा.



**स्थळ:**—सिंदखेड-जाधवरावांचा वाडा.

( इसामिय्या विचार करीत फिरत आहे. )

**इसामिय्या:**—शहाजी भोंसल्याचें बंड मोडीन तरच पुन्हां दिल्लीस परत येईन, असा बादशाही दरबारांत पैजेचा विडा उचलून मी इसामिय्या दक्षिणेत निघून आलों, तो इज्जत गमावून मरून जाण्यासाठींच इकडे आलों असें आतां वाटूं लागलें आहे! या मुलखांत शहाजी भोंसल्याने जी धामधूम उठवली आहे तिला आगा ना पिच्छा! हजारों लाखों मराठ्यांनीं झोंपेंतून एकदम जागें झाल्याप्रमाणें खडबडून उठावें, अतोनात आवेशानें आणि घाईनें लढाईच्या तयारीला लागावें, शहाजी भोंसल्याचा केव्हां काय हुकूम येतो इकडे उत्कंठेनें डोळे लावून बसावें, असें झालें आहे तरी काय? काय या लोकांना एकदम वेड लागलें म्हणावें, की भुतानें पछाडलें म्हणावें, की जादूनें भारलें म्हणावें? शहाजीनें असें कोणचें आमिष तमाम मराठ्यांच्या डोळ्यांपुढें धरलें आहे, की जें मिळवण्यासाठीं त्यांनीं बेफामपणानें आगींत उडी घ्यायला तयार व्हावें? सर्व अक्कलेची जुरत लढवून या फिसालतीचा तपास आधीं लावल्याखेरीज हें शहाजीचें बंड मोडायचें नाहीं! ( पडद्यांत ' फिर्याद ' ' फिर्याद ' असा शब्द होतो. ) कोण फिर्यादी आहे? कशाबद्दल फिर्याद? ( कमालखान येतांना अंतरावरून दृष्टीस पडतो. ) ( त्रासून ) हा तर आमच्या घरचा देवडीवाला गांजेकस कमालखान! दिल्लीस घरचीं माणसें याला कंटाळलीं, आणि पिढीजाद नोकर असल्यामुळें हांकलूनही देतां येईना, तेव्हां तुला दक्षिणेंत अंमलदारीचें मोठ्ठं मोठ्ठं काम लावून देतों अशी थाप देऊन याला लष्करा-बरोबर या मुलखांत आणलें, आणि फत्तेखानाकडे याची सोय लावून याला दौलता-बादेस पाठवलें. इतकें केलें तरी ही ब्याद पुन्हां आपली इथें हजरच! ( कमालखान जवळ येतो. )

**कमालखान:**—मी कमालखान फिर्यादी आहें. शहाजी भोंसल्यानें मला काठ्या मारवून माझी हुरमत घेऊन मला दौलताबादेबाहेर हांकून लावलें; हा माझी फिर्याद आहे.

**इसामिय्याः**—अरे कमाल ! तुला दौलताबादेची फौजदारी देण्याविषयीं शिफारसपत्र देऊन फत्तेखान वजीराकडे पाठवलें होतें; तो तूं स्वतःवरच फौजदारीचा अंमल झाल्याचा बोभाटा सांगत माझ्याकडे येतोस याचा अर्थ काय? भोंसल्यानें तुझा जो काय गुन्हा केला म्हणून सांगतोस त्याची फिर्याद तूं तेथच्या तेथेंच फत्तेखान वजीरासमोर नेली असतीस तर त्यानें तत्काळ तुझी दाद घेतली असती. तें करायचें सोडून तुला इकडे येण्याचें कारण काय?

**कमालः**—मिय्याजी, भोंसल्याच्या सांगण्यावरून सुलतानानें फत्तेखानास वजीराच्या कामावरून बडतर्फ केलें. मग फत्तेखान माझी दाद कशी काय घेणार तें तुम्हीच सांगा !

**इसामिय्याः**—काय? सुलतानानें फत्तेखानाला बडतर्फ केलें?

**कमालः**—होय मिय्याजी ! आणि फत्तेखानाची तरफदारी घेऊन मी भोंसल्याशी लढायला उठलों म्हणून माझी पाठ उगीचच्या उगीच मारानें मऊ होऊन गेली !

**इसामिय्याः**—ते कसें काय झालें सांग पाहूं?

**कमाल०ः**—फत्तेखान बडतर्फ होतांच मीं भोंसल्याला मुकाबल्याला बोलावलें. तरवार, बंदूक, भाला, वाटेल ते हत्यार तुझें तूं पसंत कर, तूं सांगशील त्या हत्यारानें तुझ्याशीं मुकाबला घ्यायला मीं तयार आहें, लढायला भीत असलास तर शरणचिठी लिहून दे, असा मी भोंसल्याला निरोप पाठवला.

**इसामिय्याः**—वाहवा ! वाहवा ! कमाल ! तूं बहादरीची कमाल केलीस ! बरें मग? शहाजी भोंसला बडा लढवय्या सरदार ! तुझ्याशीं लढायला तो ईर्षेनें धांवून आला असेल !

**कमालः**—( तिरस्कारानें ) वो नामर्द जनाना और हमारा मुकाबिला ! तोंड पहा त्या लढणाऱ्याचें ! त्यानें स्वतः लढाईला न येतां माझ्याकडे एक शिपाई पाठवून दिला ! काय त्याचें नांव तें ! ( आठवून ). हो, आठवलें. त्याचें नांव रायबा भोंसला.

**इसामिय्याः**—बरें. ह्या रायबाशीं तरी तुझी लढाई झाली कीं नाहीं?

**कमालः**—अहो कसला हल्कट नादान माणूस तो ! त्याने मला पकडून मुसक्या बांधून माझी मिरवणूक काढली !

**इसामिय्या:**—( स्वगत ) धिंड काढली म्हणायचे तें मिरवणूक काढली म्हणतो आहे !

**कमाल:**—आणि मला काठ्या मारमारून हांकून लावलें ! मिय्यासाहेब ! हीच माझी फिर्याद. तुम्ही मोंगलाई राज्याचे मुख्य सरदार. माझ्या फिर्यादीचा इनसाफ तुम्हांजवळ मागण्याचा माझा हक्क आहे; आणि हा इनसाफ मी सांगेन त्या तऱ्हेनें व्हावा हाच माझा अर्ज आहे.

**इसामिय्या:**—कोणचा इनसाफ तुला पाहिजे ? एखादा गांव तुला इनाम दिला किंवा एखादें वतन मिळवून दिलें म्हणजे बसशील कीं नाहीं गप्प ?

**कमाल:**—नाहीं मी गप्प बसणार ! बेइज्जतीनें पोळलेल्या जिवाचें समाधान असल्या देणग्यांनीं कसें होईल ?

**इसामिय्या:**—मग तुला पाहिजे तरी काय ?

**कमाल:**—माझें म्हणणें असें आहे कीं, शहाजी भोंसल्याकडून मला शरणचिठी मिळाली पाहिजे ! मी शरण आलों असें तो तोंडजबानी सांगेल, पण तेवढ्यानें नाहीं भागावयाचें ! त्यानें स्वदस्तूरची चिठी लिहून दिली पाहिजे.

**इसामिय्या:**—( हंसत ) वाहवा ! क्या अच्छा ख्याल कर रहे हो ! प्रत्येक गांजेकसाच्या मनांत कांहीं तरी खूळ भरलेलें असायचेंच ! तुझ्या मनांत हें शहाजीच्या शरणचिठीचें खूळ भरलें आहे म्हणा !

**कमाल:**—याला खूळ म्हणतां तुम्ही ? अहो, पण मी सांगतों आहेंना, कीं ती शरणचिठी मिळवण्यासाठीं चार पंच साक्षीला ठेवून मी शहाजी भोंसल्याशीं लढायला तयार आहें. हो ! त्याला काय हरकत !

**इसामिय्या:**—( हंसत ) बरें बरें ! शहाजी भोंसल्याकडून शरणचिठी मिळवण्याच्या उद्योगांत मी आणि जाधवराव आहोंच. आमच्या कामाबरोबर तुझेंही काम सहजासहजीं होऊन जाईल ! कांहीं चिंता नाहीं. पण हें काम होण्याला अवकाश फार लागेल. तेथपर्यंत तुझी कांहीं तरी सोय लावून दिली पाहिजे. ( स्वगत ) मी इथें नानाप्रकारचीं कारस्थानें घाटणार. हा गांजेकस माणूस कोणाजवळ काय भकेल याचा नाहीं नेम. याला जवळ ठेवण्याची सोय नाहीं ! पण घालवावा कुठे ? ( विचार करून ) हो ही चीज जाधवरावांच्या घरांत यावी सोडून म्हणजे त्यांच्या घरांतली खडान्‌खडा खबर न विचारतां न पुसतां हा मला येऊन

सांगेल ! निराळा गुप्त हेर ठेवायला नको ! ( उघड ) अरे कमालखान जाधवरावांची दौलत मोठी आहे. त्या दौलतींत तुला नोकरी लावून देतों. दिल्लीस आमच्या देवडीवर जमादारी करीत होतास, तसाच तूं जाधवरावांच्या देवडीवर जमादार झालास तर चांगलाच शोभशील ! तेंच काम तुला देववतों.

**कमालः**—( नाक मुरडून ) ऊंः ! मरगट्टयाची चाकरी कोण करतो ? मला नको ती चाकरी ! मी आपला तुम्हांजवळच राहतों.

**इसामिय्याः**—( स्वगत ) अरे ये क्या बला ! मै इस्को दूर निकालना चहाता हूं, मगर ये मेरेहि गले पडना चाहता है ! ( उघड ) अरे कमाल, जाधवराव मरगट्टे झाले म्हणून काय झालें ? शहाजीकडून तुला शरणचिठी मिळायला पाहिजेना ? झालें तर ! शहाजीची आणि जाधवरावांची सख्त अदावत आहे. जो त्यांचा दुष्मन तोच तुझा दुष्मन ! त्यांचें तुझें ठीक जमेल. त्यांच्याच खिजमतीस तूं असलास तरच तुझें काम लवकर होईल. तैनात भरपूर देववतों. जाव जाव, कुच फिकर मत कर !

**कमालः**—खैर, तुमकू पसंत है तो मैं जाता हूं. हां ! मगर शहाजीकी शरणचिठी मिलना चाहिये. ( जाऊं लागतो. )

**इसामिय्याः**—थांब. थांब. दौलताबादेची कांहीं खबर सांगशील कीं नाहीं ?

**कमालः**—आणखी कोणची खबर सांगूं ? मी ज्या दिवशीं गेलों त्याच दिवशी फत्तेखान बडतर्फ झाला.

**इसामिय्याः**—( स्वगत ) मुलगा पायगुणाचा पडला !

**कमालः**—दुसऱ्या दिवशीं माझी मिरवणूक निघाली तें तुम्हांला सांगितलेंच. आज तिसरा दिवस तों मी इथे हजर आहेंच ! ( सुचल्यासारखें दाखवून ) हो ! एक मात्र चांगली खुषखबर तुम्हांला कळवण्याजोगी आहे ती ऐका आणि आनंद करा !

**इसामिय्याः**—( उत्सुकतेनें ) एवढी आनंदाची कोणची खबर म्हणतोस ? सांग, सांग लवकर !

**कमालः**—सांगूंच तर ? बरें, ऐका. दौलताबादेंत पैशाला झोळीभर गांजा मिळतो ! आहे कीं नाहीं नामी खबर ? झालांत कीं नाहीं खूष ?

**इसामिय्याः**—चल! चालता हो! ही कसली बातमी मला सांगतोस? ( कमालखान जातो. ) सुलतानानें फत्तेखान वजीराला बडतर्फ केल्याची बातमी यानें सांगितली ती ऐकून मन बेकरार झालें. कारण, फत्तेखान हा मोंगलसरकाराच्या नेमणुकीचा माणूस. त्याला शहाजीने वजीरीच्या कामावरून काढवलें याचा अर्थ मोंगलसरकाराशीं जंग सुरू केल्याचें त्यानें शिंग फुंकलें, असाच घेतला पाहिजे! आतां यापुढें तो काय काय कारस्थानें खेळवतो हें ओळखून त्यांचा वेळच्या वेळींच बंदोबस्त करीत राहिलें पाहिजे. अथवा भोंसल्याचीं असलीं कारस्थानें हाणून पाडण्यासाठीं मनाला तकलीफ देण्यापासून कोणचा फायदा? जहरी झाडाच्या या नुसत्या फांद्या आहेत! या तोडून टाकण्याआधीं फितुरीचा मूळबुंधा कुठे आहे तो शोधून काढून त्यावरच घाव घातला म्हणजे फांद्यांची काय हकीकत! त्या आपोआपच खालीं पडतील! ( हेर येतांना पाहून ) हां! हा माझा हेर दौलताबादेस पाठवला होता तो तिकडून आतांच येतांना दिसतो आहे. हा काय खबर सांगतो पाहूं या. ( हेर येतो व मुजरा करितो. ) कायरे, दौलताबादेची काय खबर?

**हेरः**—साहेब! खबर दहशत उत्पन्न करणारी असून ती शहाजी भोंसल्याच्या संबंधाची आहे.

**इसामिय्याः**—अफ्सोस्की बात! अब भोंसलोंकी तमाम खबरें दहशत दिलानेवालीहि रहेंगे! त्यांत नवलविशेष तें काय असणार?

**हेरः**—पण मी सांगतों या बातमींत नवल आणि विशेष दोन्ही आहेत हें तुम्हीच कबूल कराल. बातमी अशी आहे कीं शहाजी आणि त्याची बायको जिजाऊ यांना एके दिवशीं कोणी एक अवलिया फकीर येऊन भेटला व त्यानें त्यांना एक फळ दिलें, आणि आशिर्वाद दिला कीं, हें फळ तुम्ही खा म्हणजे तुम्हांला बेटा होईल तो छत्रपति म्हणजे सार्वभौम बादशहा होईल!

**इसामिय्याः**—( चपापून स्वगत ) असें काय? शहाजीच्या बंडाचा फैलावा याच बातमीमुळें झाला नसेलना? ( उघड ) यांत काय आहे? असले ढोंगी धुतारी फकीर दारोदार भटकत असतात आणि पैसा दुगाणीवारी लागतील तितके आशीर्वाद देत सुटतात! यांत नवल कोणचें आणि विशेष तें काय?

**हेरः**—फकिराच्या आशीर्वादाप्रमाणें जिजाऊ गरोदर असून तिला हल्लीं पांचवा महिना सुरू आहे.

**इसामिय्याः**--हें मात्र नवल खरें ! तरी पण इथेही बोला फुलाला गांठ पडली असें म्हणायला जागा आहे.

**हेरः**--असेल. पण अलम् दुनियेला तसें वाटत नाहीं. जिजाऊला मुलगाच होणार आणि तो छत्रपतिच होणार हा लोकांचा पक्का खंबीर विश्वास आहे.

**इसामिय्याः**—( स्वगत ) बस्स ! हो गया अब सब खुलासा ! ( उघड ) एकूण लवकरच छत्रपति जन्माला येऊन तुमचें नुसतें स्वतंत्र राज्य होणार एवढेंच नव्हे, तर शाहेनशाही दौलत तुम्हांला मिळणार; हें आमिष शहाजीनें तमाम मराठ्यांच्या डोळ्यांपुढें धरलें आहे ! एकंदर मराठ्यांनीं झोपेंतून एकदम जागे झाल्याप्रमाणें खडबडून उठावें अशा प्रकारचें हें आमिष आहे खरें !

**हेरः**—या गोष्टीवर लोकांचा विश्वास बसूनच हें प्रकरण थांबलेलें नाहीं ! आतां हें खूळ मराठे लोकांच्या मनांत इतकें पक्कें भिनलें आहे कीं, ते लोक शहाजीला आणि जिजाऊला देवाप्रमाणें भजूं लागले आहेत !

**इसामिय्याः**—या अल्ला ! ये काफीर कैसे बेवकूफ है !

**हेरः**—आणि त्यांच्या मनानें असें पक्कें घेतलें आहे कीं, हा छत्रपति जन्मास आल्याबरोबर चकत्यांच्या पादशाहीचा विध्वंस होऊन तमाम हिंदुस्थानांत मराठ्यांचें साम्राज्य सुरू होणार ! असले वेडे पीर मोजायचे झाले तर त्यांची मोजदाद आतां शेंकड्यांनीं आणि हजारांनीं व्हायची नाहीं ! ती लाखांनींच केली पाहिजे ! या लोकांचें आंतून असें ठरलें आहे कीं, शहाजीकडून इशारा मिळतांच चोहोंकडून मोंगलांवर तुटून पडायचें आणि त्यांची कत्तल करून टाकायची !

**इसामिय्याः**—तूं म्हणतोस तसा दुष्ट बेत या बंडखोरांचा असावा असें मलाही वाटूं लागलें आहे.

**हेरः**—मला कांहीं असल्या दरबारी मसलतींचे छक्केपंजे समजत नाहींत; पण माझ्या अडाणी बुद्धीला असें वाटतें कीं हा कोण छत्रपति म्हणतात तो जर तुम्ही जन्माला येऊं दिलात तर दक्षिणेंतून मोंगल बादशाहीचें ठाणें उठलेंच समजा !

**इसामिय्याः**—अरे भाई, दक्षिणेंतून कां, दुनियेंतून उठलें असेंच समजलें पाहिजे ! बरें आहे. तूं सांगितलेंस याचा विचार पाहतां येईल. ( हेर जातो ) हे कंगाल मराठे शेतकरी एकदम इतके बेताल होऊन मुलखांत दंगा माजवायला तयार झाले याचें कारण हें असें आहे तर एकूण ! यांना जर असेंच नाचूं दिलें तर शेवटीं त्याचा पल्ला

कोठवर जाईल बरें? लाखों मराठ्यांच्या मनांत एकदां लढाईचें वारें भरल्यावर त्याची मजल कोठवर जाईल तें काय सांगावें? ते इराण तुराणापर्यंत धिंगाणा घालतील; आणि त्यांच्या झपाट्यांत आमचे मोंगल बादशहा व इतर राजेरजवाडे सांपडले म्हणजे त्यांचा चेंदामेंदा होऊन त्यांच्या तक्तांचा चकनाचूर होऊन जाईल! इतकें महात्म्य या होऊं घातलेल्या छत्रपतीच्या नांवाचें आहे! ( विचार करून ) हा मोंगलबादशाहीचा काळ जिजाऊच्या पोटांत आहे तोंच त्याला जर आम्हीं नेस्तनाबूद केला तर मात्र हा प्रळय होण्याचें टळेल. पण जिजाऊ आमच्या हातीं लागायची कशी आणि तिच्या गर्भाचा नाश व्हायचा कसा? ( पुन्हां विचार करून ) हो! जिजाऊ ही जाधवरावांची मुलगीच आहे त्याअर्थी कांहींतरी निमित्तानें तिला नवऱ्याच्या ताब्यांतून काढून इकडे आणायचें काम जर जाधवरावांनीं मनावर घेतलें तर होण्यासारखें आहे! आणि एकदां ती आमच्या ताब्यांत सांपडली म्हणजे तिच्या गर्भाचा नाश करणें कांहींच मुष्कील नाहीं! पण जाधवराव आमच्या बेतांत सामील होतील काय? कां न होतील! झालेच पाहिजेत. ज्याअर्थी भोंसल्यांशीं त्यांचें हाडवैर पडलें आहे त्याअर्थी भोंसल्यांच्या कुळांतला पुरुष जर कधीं काळीं छत्रपति झालाच तर तो मोंगलांबरोबर जाधवरावांचाही नाश केल्याखेरीज कधीं सोडणार नाहीं! जें आम्हांला भय तें त्यांनाही भय आहेच! आमच्या मसलतींत त्यांना सामील झालेंच पाहिजे. ( पुन्हां विचार करून ) छे बुवा! हें सारें अवघडच काम दिसतें आहे. किती झालें तरी जिजाऊ हा जाधवरावांच्या पोटचा गोळा आहे. तिच्या गर्भाचा नाश करण्यापर्यंत त्यांच्या अदावतीची मजल जाईल कीं न जाईल हें कोणीं सांगावें? असो. ती पुढची गोष्ट आजच त्यांजवळ कशाला काढा? जिजाऊला इथें आणायचें कलम पहिलें. तेवढें काम त्यांच्याकडून साधून घेतलें म्हणजे पुढचें पुढें पाहतां येईल. तिला इथें कां आणायचें हा सुगावा त्यांना इतक्यांतच लागूं देतां उपयोगीं नाहीं! ते पापाला फार भिणारे आणि मानी आहेत. एकदम बिथरले तर करा काय? आधीं त्यांच्या घरांतल्या बायकांबद्दल त्यांजवळ माझ्यासारख्या परक्या माणसानें बोलणें हें भारी अवघड आणि नाजूक काम. त्यांतून आपल्याला मतलब साधायचा आहे, तेव्हां ओघाओघानें फारच जपून बोललें पाहिजे. तर आतां जाधवरावांकडे जाऊन यांतलें कांहीं बोलणें तेथें काढतां येईल तर पाहूं या! ( चालतां चालतां ) खुदाया! कितनी ताजूबकी बात है! मी दिल्लीहून शहाजीचें

बंड मोडण्यासाठीं मुद्दाम आलों तें राहिलें बाजूला; आणि जिजाऊचें बंड कसें मोडेल ही नवीनच फिकीर माझ्या पाठीस लागली ! इतर ठिकाणीं असें घडतें कीं मुख्य बंड मोडलें म्हणजे त्याच्या पोटांतलीं बंडें आपोआपच मोडतात. इथे तसें नाहीं. इथे पोटांतलें बंड आहे तेंच फार भयंकर आहे !!! मुख्य बंड शहाजीचें, तें या पोटांतल्या बंडापुढें कांहींच नव्हे ! खरें पाहिलें तर हें जिजाऊचें बंड मोडण्याचें काम आहे जाधवरावांचें, पण धरा मारा तोडा कापा हाणा या मंत्रापलीकडे त्यांच्या गुरूनें त्यांना कांहीं शिकवलेलेंच नाहीं ! शहाजीशीं लढायची त्यांनीं मारे कडेकोट तयारी चालविली आहे; पण त्यांची ती बदशकुनी लडकी आणि तिला होणारें तें इब्लिस बाळ यांच्यामुळें मोंगलसरकारावर केवढा अनर्थ ओढवणार आहे याची त्यांना दाद असेल तर शपथ ! ( पाहून ) हे जाधवराव इकडून तिकडे पाय आपटीत चरफडत फिरताहेत यावरून फत्तेखानाच्या बडतर्फीची बातमी यांना कळलेली दिसते. पहावें आतां काय काय करतात तें ! ( जाधवरावाजवळ जाऊन ) राजाजी, फत्तेखानाला सुलतानानें बडतर्फ केल्याची बातमी आली आहे. सुलतानाचा केवढा हा मूर्खपणा !

**जाधव०:**—अहो, तेवढ्यावरच कुठे त्याचा मूर्खपणा थांबला आहे ? वजीरीच्या अधिकारावर त्यानें शहाजी भोंसल्याची नेमणूकसुद्धां करून टाकली ! काय अवदसा आठवली पहा बिचाऱ्याला !

**इसामिय्याः**—काय ? भोंसला इतक्यांतच वजीर झालासुद्धां ! हें तुम्ही कशावरून म्हणतां हो ?

**जाधव०:**—कशावरून म्हणतां ? हें पहा शहाजीचें स्वदस्तूरचें पत्र ! (पत्र देतो.)

**इसामिय्याः**—( वाचून उसासा टाकून ) होय. राजेसाहेब, भोंसल्याची चढती कमान आणि बढती दौलत ! क्या किया जाय ! मर्जी खुदाकी !

**जाधव०:**—गुलाम माझ्या नाकांत काड्या घालतो आहे ! कसें कसें मानभावीपणाचें लिहिणें आहे पाहिलेंतना ? काय म्हणे मलिकंबर वजीर तुमचा दुस्मान् होता त्याच्या जागीं मी वजीर झालों म्हणून तुम्हांला आनंद वाटला पाहिजे ! यांत कसला आनंद मानायचा हो ? पोटशूळ गेला, कपाळशूळ उठला ! पटकी गेली, महामारी आली ! यांत आनंद मानायचा तो कशाबद्दल ?

**इसामिय्याः**—पण राजाजी, ही तुमचीच बेपर्वाई तुम्हांला भोंवते आहे. शहाजीचा बंदोबस्त करायचा आयता मोका तुम्हांला मिळाला होता तो गमावलात आणि आतां पस्ताव्यांत पडलां आहांत! अब पस्ताय हो तो क्या जब चिडिया चरगये खेत!

**जाधव०:**—कोणचा मोका मी गमावला म्हणतां?

**इसामिय्याः**—अहो, जेव्हां तो शहाजी भोंसला तुम्हांला भेटायला आला होता तेव्हांच त्याला कैद केलें असतेंत तर इतका घोंटाळा कशाला माजला असता?

**जाधव०:**—( आश्चर्यानें ) छे छे! काय बोलतां हें! विश्वासानें जो माणूस भेटायला येतो त्याशीं विश्वासघात करून त्याला कैद करायचें?

**इसामिय्याः**—त्यांत काय आहे! आम्हीं मोंगल लोक कारस्थानी म्हणवतों आणि म्हणूनच पृथ्वीचें राज्य करतो आहो! आमच्या कारस्थानाच्या मार्गांत पोटचें पोर आडवें आलें तरी तें सुद्धां आम्हीं कापून बाजूस फेंकून देतों आणि आपला रस्ता चोखाळून दुरुस्त ठेवीत असतों. हा तर मोंगल लोकांचा नेहमींचा रिवाज आहे.

**जाधव०:**—असेल. पण मराठ्यांचा रिवाज तसा नाहीं. विश्वासानें घरीं आलेल्या माणसांशीं मी विश्वासघात कधीं करणार नाहीं.

**इसामिय्याः**—( स्वगत ) करशील. करशील. तशी दगाबाजी मी तुझ्या-कडून करवीन तरच माझी शहामत!

**जाधव०:**—वैरी झाला तरी लढाईत समोरासमोर त्याचे माझे काय दोन हात व्हायचे ते होऊन जातील, पण दगा करून वचनाचें सच्चेपण मी कदापि गमावणार नाहीं.

**इसामिय्याः**—( स्वगत ) ठीक आहे. वचनाच्या कामांत जर तूं खरोखरच इतका भोळा असशील तर तुझ्या भोळेपणापासून मलाही फायदा करून घेतां येईल! ( उघड ) बरें. तें असो. भोंसल्यानें वजीरात वळकावली त्यापक्षीं निजामशाहीचे किल्लेकोट फौज खजिना, सारें राज्यच त्याच्या लगामीं लागणार. याचा विचार तुम्हीं काय योजला आहे?

**जाधव०:**—त्याचा कसला आला आहे विचार! मीच दौलताबादेस जाऊन वजीरीचा अधिकार माझ्याच हातांत घेतों. त्याशिवाय सुलतानाचे वेडेचार बंद

व्हायचे नाहींत. मी महाराजा लुखजी जाधवराव मोंगलबादशहांचा दक्षिणेंतला प्रतिनिधि आहें, मला कळवल्याखेरीज वजीरीची बहाली बडतर्फी करण्याचा सुलतानाला अधिकार काय? आज त्यानें शहाजीला वजीरी दिली, उद्यां राज्य देईल! पण मी तें चालूं द्यायला पाहिजेना?

**इसामिय्याः**—पण जो वजीरीचा अधिकार तुम्ही हातांत घेणार म्हणतां तो शहाजीनें आगाऊच बळकावला आहे; त्याची काय वाट?

**जाधव०:**—सुलतानाला तंबी देऊन त्याजकडून शहाजीला निजामशाहींतून हांकून लाववतों. तसें करण्याविषयीं सुलतानाला मोंगलसरकारांतून लिहून गेलेंच आहे. त्यांतून मीं प्रत्यक्ष सांगितल्यावर नाहीं म्हणायची त्याची काय किंमत आहे? सुलतानाचा आधार तुटल्यावर शहाजी सहजींच हलका पडेल आणि मग तुमची आमची आणि सुलतानाची फौज मिळून शहाजीला झोडपून काढूं!

**इसामिय्याः**—ही तुमची मसलत बहुत पसंत आहे. परंतु तुमच्या सांगण्यावरून शहाजीला हांकून लावायला सुलतान कबूल होईल कीं न होईल एवढीच काय ती शंका!

**जाधव०:**—कबूल न होईल तर काय करील? शहाजीसाठीं राज्य गमावील कीं काय? आयती पोळी खायची सोडून भिकेची झोळी त्याला पतकरायची असेल तर पतकरीना बापडा! माझें त्यांत बरेंच आहे. निजामशाही राज्याची कुलमुखत्यारी माझ्या हातीं असावी, आणि सुलतानाला उगीच नांवाचा धनी म्हणून राखावें अशी बादशहांची मर्जी आहेच. त्यांतून सुलतान जर आपोआप नाहींसा होत असेल तर फारच चांगलें!

**इसामिय्याः**—( स्वगत ) स्वारीची घमेंड तर खूबच दिसते आहे! बोलतो आहे यांतलें काय काय घडून येणार तें दिसतेंच आहे! ( उघड ) एकूण तुम्हीं दौलताबादेला जाण्याचा मनसबा पक्का ठरवलात म्हणायचा!

**जाधव०:**—होय. चार दोन दिवसांतच जाणार.

**इसामिय्याः**—तें कसें घडणार? बरोबर न्यायला इथे फौज म्हणावी तर तुमचीही नाहीं; माझीही नाहीं.

**जाधव०:**—कशाला पाहिजे फौज? कोण आम्हांला खायला बसलें आहे तिथे! फत्तेखान माझा, सर्व उमराव माझे, सर्व निजामशाही फौज माझी, आणि इतकें असल्यावर मला काय भय आहे?

**इसामियॉ:**—तें कांहीं असो. सुलतानाच्या दरबारांत शहाजीचा बोलबाला आहे. शहाजीचें तुम्हांशीं वांकडें आहे. तुम्ही त्याची वजीरी काढण्यासाठीं मुद्दाम जात आहां. समजा, शहाजीनें तुम्हाला दगा करून कैद केलें तर काय कराल?

**जाधव०:**—छे. छे. शहाजी भोंसला भला गृहस्थ आहे. तो कधीं असलें कर्म करणार नाहीं.

**इसामियॉ:**—अहो, तुम्ही शहाजीचे भलेपणावर बेफाम राहूं नका. दिवस कसे आले आहेत हें पहातां ना? तुम्हांला दौलताबादेंत पाऊल ठेवायचेंच तर आधीं शहाजीच्या जिव्हाळ्याचें—अगदी जिव्हाळ्याचें—कोणी माणूस ओलीस ठेवून घ्या, आणि मग जायचें तर जा. त्याशिवाय जाऊं नका.

**जाधव०:**—असें ओलीस ठेवून घ्यायला शहाजीच्या जिव्हाळ्याचें माणूस कुठचें आणावें!

**इसामियॉ:**—कां बरें? त्याची वायको जिजाऊ राणी तुमची मुलगीच आहे. तिला माहेराकरतां म्हणून आठ पंधरा दिवस रहायला आणा आणि मग दौलताबादेस खुशाल जा! बायकोच इकडे अडकलेली असल्यावर तुम्हांला धक्का न पोंचूं देण्याची खबरदारी शहाजी आपोआप घेईल.

**जाधव०:**—जांवई दगा करील म्हणून मुलगी जामीन घ्यायची, यांत मला फार कमीपणा वाटतो.

**इसामियॉ:**—पण मुलीला जामीनगतीदाखल ठेवून घेण्याची गोष्ट तुम्हीं मनांत आणतांच कां मुळीं? तिनें केव्हांतरी माहेरीं येऊंच नये वाटतें! केव्हांतरी आणायची ती आतांच आणा, एवढें काय तें माझें म्हणणें! राजेसाहेब, तुम्ही खेळतां आहां हा सैन्यबळाचा तुमचा नेहमींचा डाव नव्हे. हा बुद्धिबळाचा डाव आहे. यांत मोहरें इरेस धरल्यावांचून चालायचें नाहीं!

**जाधव०:**—(विचार करून) असें करावें म्हणतां? पण छे बुवा! तुम्ही म्हणतां तसें करण्याकडे माझें मन वळत नाहीं.

**इसामियॉ:**—(स्वगत) नाहीं म्हण पाहिजे तर! पण तुझें अर्धे मन वळलें आहे, अर्धें राहिलें तेंही लवकरच वळेल! (उघड) पहा बुवा! तुमचा दोस्त आणि बादशहाचा इमानी नोकर या नात्यानें तुमच्या कल्याणाची—नव्हे—मोंगल

बादशहांच्या कल्याणाची जी गोष्ट सांगणें माझें काम होतें, ती मी तुम्हांला सांगितली आहे. विचार करा आणि पाऊल पुढें टाका म्हणजे झालें ! ( जातो. )

( रुक्मिणी येते )

**जाधव०:**—कायग रुक्मिणी, कां आलीस ? काय मजकूर आहे ?

**रुक्मिणीः**—राणीसाहेबांचें म्हणणें असें आहे कीं, थोडी विनंती करायची आहे. जेव्हां रिकामा वेळ असेल तेव्हां थोडें—

**जाधव०:**—राणीवशांत येऊन जावें ! हेंच ना ? त्यांना कळव कीं, आज मी फार उद्योगांत आहें. तिकडे यायला फुरसत होणार नाहीं. ( पुटपुटतो. ) तिनें आज चार दिवस सारखी टकळी लावली आहे ! जिजीला आणा, जिजीला आणा ! कशाला हवी आहे ती भोंसली आमच्या घरीं यायला ! ( रुक्मिणी जाऊं लागते. ) थांब. जाऊं नकोस. त्यांना काय बोलायचें आहे तें सांगशील कीं नाहीं ?

**रुक्मिणीः**—( हंसत ) दुसरें कोणचें बोलणें ? सकाळीं देवघरांत बोलत होत्या तेंच !

**जाधव०:**—पुन्हां पुन्हां तेंच बोलणें ! आज त्यांनीं मला धडपणें देवपूजा देखील सुचूं दिली नाही ! मला नको तें चऱ्हाट पुन्हां ऐकायला !

**रुक्मिणीः**—( गंभीर मुद्रेने ) आज राणीसाहेब अजून जेवल्या नाहींत !

**जाधव०:**—( गडबडीनें ) सायंकाळ झाली तरी अजून जेवल्या नाहींत ! अग हें आधींच कां नाहीं सांगितलेंस ? आतां उपास ठोकण्यापर्यंत मजल आली म्हणायची ! जा. जा. त्यांना सांग कीं, इथे दुसरें कोणी नाहीं. एकटाच आहें. इकडे या आणि काय बोलायचें असेल तें बोला. जा. जातांना पहाऱ्यावर गैरराबता सांगून जा. ( रुक्मिणी जाते. ) जिजीला आणण्याबद्दल राणीसाहेबांनीं याच दिवसांत हट्ट घ्यावा आणि याच वेळीं इसामिय्यासारख्या परक्या माणसानें निराळ्या कारणाकरितां तेंच करण्याविषयीं कळकळीनें बोध करावा, हें केवढें आश्चर्य ! अपत्यवात्सल्य आणि राजकारण यांनीं कुणीकडून तरी अकस्मात् येऊन ही परस्परांना चुकून मिठी घातली आहे; यांत कांहीं तरी महत्वाचें भवितव्य सूत्रित झालेलें नसेल ना ? फुटक्या कपाळाची पोरटी ! तिच्या संभाजीला आयती मोंगलाई दौलत देत होतों ती तिला नकोशी झाली, त्यामुळें मलाही ती नकोशी झाली ! आतां झालें तरी मी ममतेमुळें तिला बोलावतों असें मुळींच नाहीं. तिला कांहीं एक

मतलबासाठींच इकडे आणावयाचें आहे. मग होईना कां राणीसाहेबांच्या मना-सारखेंच ! येऊं दे जिजीला आणि राहूंदे आठ चार दिवस ! बायकांची हौस पूर्ण होते, आणि मिय्यासाहेबांच्या शब्दाला मान दिल्यासारखा होतो; तर आतां होऊं द्या तसेंच ! ( म्हाळसाबाई येते. ) या. अजून जेवलां नाहींत म्हणे ! हा काय बरें असला अविचार !

**म्हाळसाः**—यांत कसला अविचार ! हा सुविचारच आहे या वयांतला ! मीं सोमवारचें व्रत घेतलें आहे, मग जेऊं कशी ? इकडे जन्मभर सोमवार करीत यायचें त्याचें कांहींच नाहीं, आणि मीं एकदां सोमवार करीन म्हटलें तर त्याचा केवढा बोभाटा !

**जाधव०:**—अस्सें ! बरें. बोला तुमच्या मनांत काय असेल तें ! मी जिजीला आणीत नाहीं हेंच ना तुम्ही दुःखी कष्टी होण्याचें कारण ?

**म्हाळसाः**—दुसऱ्या कोणच्या कारणाबद्दल दुःखी होऊं ? सहा वर्षांत आपण तिची माझी भेट होऊं दिली नाहीं. या सहा वर्षांत माझा कोणचा दिवस सुखाचा गेला आहे ? देवानें एक मुलगी दिली तिच्या बरोबरसुद्धां अशी बरकशी धरायची आणि तिला परदेशी करायचें ! जिजीच्या पहिल्या खेपेस तिला बाळंतपणासाठीं तरी आणावें म्हणून पाय धरधरून विनवणी केली, पण आपण नाहींच ऐकलें !

**जाधव०:**—वाहवा ! कुणी नाहीं ऐकलें ? मीं कीं तिनें ?

**म्हाळसाः**—हें काय भलतेंच बोलणें ? आपलें म्हणणें तिनें ऐकावें आणि भोंसल्यांच्या घराला मुकावें ! नाहीं तें तिला आवडलें, म्हणून तिचें नांवच का टाकून द्यायचें ? आम्हीं हेळसांड केली, पण तिची कोणची गोष्ट अडून राहिली ? मुलगा झाला आहे तो कसला देखणा छानदार मोहरा आहे म्हणतात !

**जाधव०:**—राहूं दे तें त्या वेळचें !

**म्हाळसाः**—राहूं दे कसें ? माझी जिजाऊ आणि तिचा नवरा हीं पुण्यवान् माणसें आहेत बरें ! आम्हा उपेक्षा केली तरी देवानें नाहीं त्यांची उपेक्षा केली ! या खेपेला जिजी गर्भार झाली त्यापूर्वी तिला साक्षात् जगदंबेचें दर्शन झालें !

**जाधव०:**—( मोठ्यानें हंसत ) कुणाला दर्शन झालें ? आमच्या जिजीला जगदंबेचें दर्शन ! केवढी ही पुण्याई ! दर्शन स्वप्नांत झालें वाटतें !

**म्हाळसाः**—होय. स्वप्नांत झालें म्हणतात.

**जाधवः**—मग ठीकच आहे ! आणखी कांहीं भोंसल्याच्या घरांतलें अद्‌भुत वर्तमान ?

**म्हाळसाः**—आहे तर ! ज्या दिवशीं देवीचें दर्शन स्वप्नांत झालें, त्याच दिवशी जिजीला आणि शहाजीराजांना एक स्वामी येऊन भेटले आणि त्यांनीं प्रसादाचा नारळ दिला.

**जाधव०ः**—स्वामी भेटले तेही स्वप्नांतच भेटले वाटतें ?

**म्हाळसाः**—( रागानें ) स्वप्नांत नाहीं, खरोखरच भेटले. अशी थट्टा करायची असेल तर पुढें सांगत नाहीं.

**जाधव०ः**—सांगा. सांगा. मला सगळें ऐकायचें आहे.

**म्हाळसाः**—स्वामीनीं प्रसाद दिला आणि सांगितलें की, हा प्रसाद भक्षण करा, म्हणजे तुम्हांला पुत्र होईल तो छत्रपती होईल, आणि समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य करील.

**जाधव०ः**—मग आजपर्यंत नाहीं कुठे मला सांगितलेंत हें ?

**म्हाळसाः**—कशाला सांगूं अभद्र बोलून घ्यायला !

**जाधव०ः**—एकूण जिजीचा मुलगा छत्रपति झाल्यावर त्यापुढें आम्हां जाधवरावांना मान वांकवावी लागणार म्हणायची !

**म्हाळसाः**—देवतेची तशीच आज्ञा झाल्यावर नको का वांकवायला ?

**जाधव०ः**—तुम्हीं सांगतां हें सारें झूट आहे !

**म्हाळसाः**—इकडे हें असें म्हणावें पाहिजे तर, पण जनविश्व यांतलें प्रत्येक अक्षर खरें मानतें आहे, आणि मलाही तें खरें वाटतें. जिजीसुद्धां खोटें सांगेल असें इकडे वाटतें तरी कसे म्हणतें !

**जाधव०ः**—हा भक्तिभावाचा विषय आहे. याबद्दल वाद घालण्यांत फायदा नाहीं. असो. आतां मीं काय करावें म्हणतां ?

**म्हाळसाः**—जिजीला आणायला पाहिजे हेंच म्हणायचे ! दुसरें काय ?

**जाधव०ः**—उत्तम आहे. तिला आणण्याची मलाही उत्कंठा आहे.

**म्हाळसाः**--( आनंदानें ) संभाजी राजा तिच्याबरोबर येईलच. पण येतांना त्यालाहि आणण्याबद्दल निराळें लिहायला पाहिजे.

**जाधव०ः**—लिहा ! ( स्वगत ) एकाबद्दल दोन जामीन मिळाले तर फारच चांगलें !

**म्हाळसाः**—मीं काय लिहायचें ? इकडूनच जांवई महाराजांना पत्र गेलें पाहिजे !

**जाधव०ः**—( स्वगत ) ह्यां ! मी दस्तऐवजांत नाहीं गुंतायचा ! ( उघड ) मीं जांवयांना पत्र लिहावें अशी मजा त्यांनीं ठेवलेली नाहीं. मग लिहून उपयोग काय ? लिहिलेंच तर तिसरेंच कांहीं तरी निष्पन्न व्हायचें ! तें नाहीं उपयोगी ! तुम्हीच पत्र लिहा जावयांना आणि जिजीलाही लिहा !

**म्हाळसाः**—बरें तर. मीच पत्रें लिहून तयार करतें आणि जासूद जोडी पिटाळतें !

**जाधव०ः**—जासूदजोडी कां ? सांडणीस्वार पिटाळा !

**म्हाळसाः**—आणि हो, आतांच बोलून ठेवतें आहें. जिजी एकदांची येती जाती झाली म्हणजे तिला बाळंतपणासाठींसुद्धां मी इकडे आणवणार.

**जाधव०ः**--हो ! त्याला काय हरकत आहे ? ( स्वगत ) मूर्ख माणसाची समजूत अशीच करायला हवी ! आज ही जें जें बोलेल त्याला मी हूं हूं म्हणत जाणार ! हिला नाखूष करावें तर पोरगी इथे यायला पाहिजे ती येणार कशी ?

**म्हाळसाः**—जिजी आल्यावर चांगलीं टोलेजंग डोहाळजेवणें करूं ! चांदण्यांतलें, काळोखांतलें, कोंवळ्या उन्हांतलें, झोंपाळ्यावरचें, बागेंतलें, नावेंतलें, अशीं कित्ती कित्ती तरी ! कशी पण मजा करूं अगदीं !

**जाधव०ः**—करा करा ! तुम्हांला वाटतील तसलीं डोहाळजेवणें खुशाल करा बरें ! पण आतां आधीं तुम्ही जेवण करा पाहूं ! जा !

**म्हाळसाः**--हें काय ? माझ्या जेवणाची काय एवढी घाई लागली आहे ! आणि खरेंच महाराज, आम्हां सर्वांना जिजी लवकरच भेटणार यामुळें आनंदानें माझें पोट भरून गेलें ! मला भूक कशी ती राहिलीच नाहीं ! आतां प्रदोषकाळीं बरोबरच सोमवार सोडूं ह्मणजे झालें. या क्षणीं मला केवढा हर्ष झाला आहे ! मी इथे आलें तेव्हां माझ्या विनंतीला इकडून कधीं होकार मिळेल असें कांहीं मला वाटलें नव्हतें !

**जाधव०:**--( हंसत ) हा सारा सोमवारच्या व्रताचा महिमा !

**म्हाळसा:**--( स्वगत ) खरेंच तें ! भोळा शंकर किती लवकर प्रसन्न झाला ! ( जाते. )

**जाधव०:**—हे भोंसले भारी भारीच घमेंडखोर ! बेट्यांच्या व्याकरणांत प्रथम आणि मध्यम पुरुष नाहींच ! इथून तिथून उत्तम पुरुष ! जिथे तिथे मीं केलें ! मीं जिंकलें ! मीं मिळविलें ! अहं ! आणि पूर्वीपासून पहातों आहें, हे भोंसले फार फार लबाड ! लोकांवर पगडा बसवण्यासाठीं आणि स्वतःचें स्तोम माजवण्यासाठीं काय काय कादंबऱ्या रचतील याचा नेमच नाहीं ! यांनाच तेवढा देवीचा साक्षात्कार आणि साधूंचें दर्शन जेव्हां तेव्हां होतें, आणि आम्हांला नाहीं कधीं होत तें ! आणि आमची कारटीसुद्धां त्याच ढोंगांत रंगली आहे ! पण म्हणावें, मी जाधवराव तुम्हांला पुरा वस्ताद भेटलों आहें ! काय समजतां तुम्ही ! तुमचेच दांत तुमच्याच घशांत घालतों ! तुमचीं पोरें छत्रपति व्हायला पाहिजेत नव्हे का ? दौलताबादेस जातों आणि सुलतानाला विचारतों कीं, शहाजीचा पोर छत्रपति झाल्यावर तूं त्याचें घोडें धरणारा मोतद्दार होणार कीं काय ? ही छत्रपतीची लोणकढी थाप शहाजीनें पिकवली आहे ही तूर्त सुलतानाच्या मनांत भोंसल्यांविषयीं किल्मिष उत्पन्न करायला माझ्या उपयोगीं चांगलीच पडणार ! ( जातो. )

**( अंक पहिला समाप्त. )**



# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

**स्थळः**—दौलताबाद, भोंसल्यांचा वाडा.

( शहाजी व जिजाऊ बोलत येतात. )

**शहाजीः**—राणीसाहेब, तुम्ही म्हणतां त्या गोष्टीचा सर्व बाजूंनीं विचार करून मी निराश झालो आहें. लोभी माणसाला लोभ दाखवून वळवतां येतें, परंतु ज्या जाधवरावांना राज्यलोभानें आधींच ग्रासलें आहे त्यांना वळवण्याजोगें प्रलोभन आम्हांजवळ कोणतें आहे? धाक दरारा दाखवून त्यांना दहशत बसवावी तर तेंही निष्फळ आहे. कारण भिणें म्हणजे काय हें त्यांच्या प्रकृतीला माहीतच नाहीं! त्यांना विश्वासघातानें धरण्याचा बेत योजावा तर तें आमच्या कुळाचें शील नव्हे. जबरदस्ताला अधिक जबरदस्ती दाखवून वठणीला आणायचें एवढा एक उपाय येऊन जाऊन राहिला आहे, तो करण्याच्या उद्योगांत आम्ही आहोंच! यापेक्षां कोणता निराळा उपाय तुमच्या मनांत घोळतो आहे तो सांगा.

**जिजाऊः**—उपाय आर्जवानें प्रार्थना करण्याचा! तो एक उपाय अजून राहिला आहे.

**शहाजीः**—नाही. तोहि उपाय मी करून चुकलों आहें हें तुम्हांला माहीतच आहे!

**जिजाऊः**—जांवयानें सासऱ्याची आर्जवें करणें आणि मुलीनें बापाचीं आर्जवें करणे यांत अंतर आहे.

**शहाजीः**—ज्यानें जांवयाला जांवई म्हणण्याचें साफ नाकारलें, तो कन्येला कन्या म्हणून कितपत ओळखील हें दिसतेंच आहे! त्यांतून तसेंहि करायला मीं तुम्हांला परवानगी दिली असती. परंतु आतां त्याची वेळ निघून गेली आहे. इसामिय्याची भेट जाधवराव घेऊन चुकले; तेव्हां आतां तिथे जाण्याचा काय उपयोग आहे?

**जिजाऊः**—वडिलांनीं त्या मोंगल सरदाराची नुसती भेट घेतली असली तरी त्यांजवळ अजून मोंगलाई फौज कांहीं आलेली नाहीं. त्यानीं स्वतःची फौजदेखील अजून बोलावली नाहीं. त्यांना अनुकूल करून घेण्याचा अजूनसुद्धां अवसर आहे. प्रत्यक्ष युद्ध सुरू होईपर्यंत आपण माझ्या वडिलांची शत्रुकोटींत गणना करूं नये.

**शहाजीः**—न करून कसे चालेल ? जाधवरावांचें शत्रुत्व सिद्ध व्हायला प्रत्यक्ष लढाई होण्याची गरज आतां कुठे राहिली आहे ? तो घोर प्रसंग अजून दूर आहे तों आधींच त्याच्या भावना त्यांना जाणवूं लागल्या आहेत ! तरवारीला पोलादाचें पाणी पाजण्यापूर्वीच त्यानीं स्वभावाला द्वेषाचें पाणी पाजलें आहे ! धनुष्याला वक्रता येण्यापूर्वीच कौटिल्यानें त्यांच्या मनाला वक्रता आली आहे ! समरांगणांतल्या धुळीने बहिरंग मलिन होण्यापूर्वीच राज्यलोभानें त्यांचें अंतरंग मलिन झालें आहे ! रण-वाद्यांच्या कर्कश नादांनीं कानठाळ्या बसण्यापूर्वीच ते हितोपदेशाला बधिर झाले आहेत ! ज्याची विकृति इतक्या उग्र स्वरूपाला पोंचली आहे असा मनुष्य प्रत्यक्ष तुमचा बाप असला तरी तो मस्त हत्तीप्रमाणें भयप्रद व सहवासाला अयोग्य असाच तुम्ही मानला पाहिजे. त्यांत संभाजीच्या खेपेपासून त्यांची तुम्हांवर विशेष इतराजी झालेली आहे. हें ठाऊक असून तुम्ही त्यांना प्रसन्न करण्याची आशा धरतां याचा अर्थ काय ?

**जिजाऊः**—पूर्वीची इतराजी अजून राहिली असेल असे आईच्या पत्रावरून दिसत नाही. वडिलांची व आपली भेट होऊन कडाक्याचे भांडण झाले, त्यानंतर मला माहेरचीं बोलावण्यावर बोलावणीं येऊं लागलीं; हें मी सुचिन्हच समजतें; आणि असें अनुमान काढतें कीं, वडिलांच्या वृत्तींत पश्चात्तापानें बदल झाला असावा, आणि मला भेटण्याची त्यांना इच्छा झाली असावी.

**शहाजीः**—राणीसाहेब, असें भलतेंच अनुमान करून तिकडे जाण्याच्या भरीस पडूं नका. जाल तर तुमचें दर्शन जाधवरावांना कदापि सुखदायक होणार नाही. ते तुमचा पाणउतारा करतील, निर्भत्सना करतील, किंबहुना विटंबनासुद्धां करायला सोडायचे नाहींत ! असा प्रसंग तुम्हांवर ओढवेल तेव्हां तुम्ही पस्ताव्यांत पडाल, अतिशय दुःख पावाल, देमाय धरणी ठाय असे तुम्हांला होऊन जाईल, तेव्हां काय कराल ? पूर्वी दक्षानें दाक्षायणीचा अपमान केला, तेव्हां वीरभद्रानें तत्काळ प्रकट होऊन सतीच्या अपमानाचा सूड घेतला. तुमच्या अप-

मानाचा सूड घेणारा वीरभद्र जन्मास यायला अजून अवकाश आहे! बरें, जेथें कार्यसिद्धीपेक्षां अपमान आणि विटंबनाच अधिक संभवते, असें हें संकट तुम्हीं कशाकरितां पतकरायचें, तर जाधवरावांच्या मैत्रीकरितां! राणीसाहेब, त्या मैत्रीची किंमत तीन चार महिन्यांपूर्वी होती तितकी आतां राहिली नाहीं! माझ्या मराठ-मंडळाचें सामर्थ्य सांप्रत एवढे जबरदस्त वाढलें आहे कीं, जाधवराव येवोत, मोंगल येवोत, किंवा आणखी एखादा राजा त्यांत येऊन सामील होवो, सर्व शत्रूंना लढाईत मारून तुडवून धुळीला मिळवूंच मिळवूं अशी आम्हांला खात्री वाटत आहे. आतां जाधवराव आम्हांकडे आले काय, आणि गेले काय, आम्हांला दोन्ही गोष्टी जवळजवळ सारख्याच आहेत! राणीसाहेब! जाधवरावांच्या मैत्रीची आम्हांला गरज नाहीं, आणि ती मिळवण्याकरतां हा संकटप्राय उद्योग करण्याचें तुम्हांला कारण नाहीं! सर्व महाराष्ट्राचें आणि स्वतःचें कल्याण उत्तम प्रकारें करून घेण्याचा मार्ग अनुसरण्याविषयीं मी त्यांची प्रार्थना केली होती. परंतु माझ्या प्रार्थनेचा अव्हेर करून त्यांनीं जाणून वुजून देशद्रोहाचा मार्ग पत्करला आहे, त्याचें फळ त्यांना खुशाल भोगूं द्या! असल्या निंद्य मार्गानें जाणाऱ्याला दुसरें काय मिळणार! अधःपात!

**जिजाऊः**—( उसासा टाकून ) अधःपात! अधःपात! या यवनी राज्यांत सुद्धां आजपर्यंत जे हिंदूंचे अग्रगण्य म्हणून नाणावले, त्या जाधवरावांचा अधःपात! धर्माचे सागर, धैर्याचे मेरु, प्रतापाचे सूर्य, अशा पुरुषश्रेष्ठांची मालिका ज्या कुळांत आजपर्यंत निर्माण होत आली, त्या जाधवरावांच्या कुळाचा—माझ्या माहेरच्या कुळाचा—अधःपात! महाराज, या अधःपाताचें नानारंगी भेसूर चित्र माझ्या डोळ्यापुढें उभें राहतें तेव्हां दुःखानें माझें हृदय विदीर्ण होतें! जर या अधः-पाताचा परिहार होण्याकरतां मी कांहींच केलें नाहीं, तर जाधवरावांच्या कुळांत जन्म घेऊन मीं काय केलें? यावेळीं वडिलांना सावध करण्याचा जर मीं माझ्या-परीनें उद्योग केला नाहीं, तर मीं—त्यांच्या लेंकरानें—आपलें कर्तव्य बजावलें नाहीं असें वाटून यावज्जन्म मला दुःख होत राहील. माझ्या विनंतीला मान देऊन त्यांनीं शत्रुपक्ष सोडला तर त्यांत आमचा फायदा नसून उलट त्यांचेंच कल्याण आहे. मला त्यांजवळ दैन्यवृत्तीनें कांहीं मागायचें नाहीं. मी तेथें जाईन ती छत्रपतीची माता अशाच इतमामानें जाईन आणि अशाच इतमामानें राहीन. परंतु प्रसंगोचित नम्रपणाचें मृदुमधुर भाषण करून, आर्जवानें विनवून त्यांच्याच कल्याणासाठीं त्यांची

मनधरणी करण्याचा मी यत्न करायला मात्र चुकणार नाहीं. त्यांत मला यश आलें तर उत्तमच! नाहीं यश आलें तरी माझ्या कर्तव्याची पराकाष्ठा मी केली एवढें तरी समाधान मला राहील! महाराज, हें माझें कर्तव्य मला बजावूं द्या! माहेर-घरच्या एवढ्या ऋणाची फेड मला करूं द्या! एवढा हा माझा डोहाळा आपण पुरवावा, हेंच मी मागतें आहें.

**शहाजीः**—डोहाळा पुरवण्याचीच गोष्ट तुम्ही बोलतां, तेव्हां ती मान्य करणे प्राप्तच आहे. परंतु एवढा वेळ मी आढेवेढे घेण्याचें मुख्य कारण तुमच्या ध्यानांत आलें आहे ना? होय. आलेंच असेल!

**जिजाऊः**—मुख्य कारण? कोणतें कारण?

**शहाजीः**—जें भय रात्रंदिवस माझ्या मनांत जागृत असतें, त्याची जाणीव तुम्हांलाही पूर्णपणें आहेच!

**जिजाऊः**—( किंचित् विचार करून ) होय. माझ्या गर्भाला–गर्भस्थछत्रपतीला धक्का पोचेल हेंच भय ना?

**शहाजीः**—राणीसाहेब, आमचा पुत्र छत्रपति होणार ही वार्ता दिगंतरी पसरल्यापासून प्रसिद्ध व प्रच्छन्न असे हजारों वैरी आम्हांला नवीन उत्पन्न झाले आहेत. तुमच्या गर्भावर कोणीकडून कसा मारा होईल याचा नेम नाहीं. त्याचा बंदोबस्त तुम्हीं काय योजला आहे?

**जिजाऊः**—त्याचा बंदोबस्त आम्हीं काय करायचा! तो जगदंबेनें आगाऊच योजिलेला आहे. असल्या गोष्टी दैवी कृपेवांचून सिद्ध होत नसतात. त्यांत मनुष्य-यत्नाचा अंश येतो तो क्षुद्र आहे. तरी तो क्षुद्र यत्नही माणसानें केलाच पाहिजे, अशा समजुतीनें मी सर्वकाळ सर्वत्र जपूनच वागत असतें, आणि तशी माहेरी गेल्यावरसुद्धां वागेनच!

**शहाजीः**—जाधवरावांच्या घरीं तुम्हांला या बाबतींत वस्तुतः धोका नसावा आणि नसेलही. पण इसामिय्या तेथें येऊन राहिला आहे, आणि तो केवळ माझा उच्छेद करण्याच्याच उद्देशानें दिल्लीहून प्रतिज्ञेचा विडा उचलून आला आहे, हें लक्षांत आहे ना?

**जिजाऊः**—त्या दुरात्म्याचे यत्न किती पक्केपणाचे आणि कितीही गूढ असले तरी त्यांची मात्रा माझ्यावर काय चालणार आहे? महाराज, स्वामींच्या वचनाचा

अविश्वास मानून आपण असल्या काळजींत पडावें ही फार आश्चर्याची गोष्ट आहे ! जिजाऊ, तुला पुत्र होईल आणि तो छत्रपति होईल, असें स्वामींनीं मला सांगितलें त्यावर माझा विश्वास आहे तो अढळ आहे. नद्यांचे ओघ परत फिरतील, पर्वत चालूं लागतील, सूर्य पश्चिमेस उगवेल, पण सद्गुरूचें वचन कालत्रयींसुद्धां अन्यथा होणार नाहीं ही माझी खात्री आहे. मी निर्भय असतां माझ्याबद्दल व्यर्थ चिंता कां वाहतां ? महाराष्ट्रांत स्वराज्याचा चैतन्य चंद्रोदय व्हावा ही जिची इच्छा, ती परमेश्वरी मी जिथे जाईन तिथे माझ्या पाठीशीं उभी आहे हें आपण पक्कें समजावें.

**शहाजीः**—होय. ती आमच्या पाठीशीं उभी आहे हें तर सर्वांशीं खरेंच आहे. ( कांहीं सुचल्यासारखें करून ) हो, एक नवीच गोष्ट तुम्हांला सांगायची ती अजीबात राहिली ! सुलतानाच्या मातुःश्रीनीं—बड्या बिबीसाहेबांनीं तुम्हांला पांच बटकी बहाल केल्या आहेत. त्या पेशावरकडच्या मुसलमानणी आहेत. त्या आजच आमच्या घरीं येतील. माहेरीं जातांना तुम्हीं त्या बटकींना बरोबर घेऊन जा.

**जिजाऊः**—बटकी आणि मुसलमानणी ! त्या बरोबर नेऊन काय करायच्या ?

**शहाजीः**—त्या बटकींना नेहमीं बरोबर वागवण्याविषयी बिबीसाहेबांचा तुम्हांला हुकूम आहे. आणि माझीही पण आज्ञा तशीच आहे. त्या बुरख्यांत रहाणाऱ्या पडदपोशीच्या बायका आहेत. त्या मेण्यांतून तुमच्या स्वारीबरोबर येतील. त्यांना तुम्ही आणि तुम्हांला त्यांनी केव्हांहीं विसंबायचें नाहीं असें मीं ठरवलें आहे. जा. उद्यां निघायची तयारी करा. तुम्हांबरोबर फौज सरंजाम काय काय द्यायचा त्याची तजवीज करतों. राणीसाहेब, जी गोष्ट आपलें कुर्तव्य म्हणून तुम्हीं परमार्थबुद्धीनें करणार, त्याला आड येणें योग्य नाही असें समजून मीं तुम्हांला माहेरीं जाण्याची परवानगी दिली आहे. तथापि तुमची खटपट म्हणजे हा एक भगीरथ यत्न आहे, असें म्हटल्यावांचून रहावत नाहीं.

**जिजाऊः**—पूर्वजांच्या आत्मोद्धारासाठीं मला भगीरथ यत्न पडला तरी चिंता नाहीं. मात्र भगीरथाच्या यत्नाप्रमाणें तो सफळ होवो म्हणजे झाले ! ( जातात. )

---

## प्रवेश २ रा.



**स्थळ:**—दौलताबाद. दरबारचा दिवाणखाना.

( निजामशहा तक्तावर बसला आहे. तक्ताखालच्या पायरीवर शहाजी बसला आहे. कांहीं दरबारी दोहोंबाजूंनीं उभे आहेत. परिवारवर्ग आपापल्या कामावर हजर आहेत. भालदार " महाराजा लखुजी जाधवराव हिंदुरायरायां समशेरजंग वजारत मा आब " असें जाधवरावाचें नांव पुकारतो. जाधवराव येतो. शहाजी तक्ताच्या पायरीवर बसलेला पाहून जाधवराव आश्चर्यानें व रागानें स्तब्ध होतो. )

**चोपदार:**—( जाधवरावाजवळ जाऊन हळूच ) राजेसाहेब, असे स्तब्ध काय उभे राहिलांत? सारा दरबार तुम्हांकडे टकमक पहात आहे. मुजरा करा आणि आपली जागा धरा !

**जाधव०:**—( निजामशहास ) खुदावंत ! तकशीर माफ असावी. नोकरानें मालकाची मुलाखत होतांक्षणीं कुरनिसात करावी हा त्याचा धर्म आहे, पण हुजूरला कुरनिसात करूं जावें तर शहाजी भोसल्याला कुरनिसात केल्यासारखें होतें, सबब त्याला तक्ताच्या पायरीवरून हांकून लावल्याखेरीज मला कुरनिसात करतां येत नाहीं ! बंदा लाचार आहे. ( शहाजीस ) शहाजीराजे उठा ! उठा तेथून. दरबारची अदब तुम्ही मोडूं नका आणि माझ्याकडून मोडवूं नका. ( शहाजी निजामशहाकडे पहातो. )

**निजाम:**—शहाजीराजे, उठूं नका. जाधवराव, माझ्याच दरबारीं येऊन मुद्दाम माझी बेअदबी करतां हा कोण मस्तवालपणा ? आधीं, आधीं मुजरा ! मग बोलणें.

**जाधव०:**—शहाजी भोंसले, तुम्ही माझे जांवई आहां. सासऱ्यानें तुम्हांला नमस्कार करावा म्हणतां कीं काय ?

**शहाजी:**—घरीं मी दहादां पायां पडेन. हा दरबारी व्यवहार आहे. इथे त्या नात्याचा काय संबंध !

**जाधव०:**—हुजूर, माझा नाइलाज झाला. मुजऱ्याची मला माफी मिळावी.

**निजाम:**—( रागानें ) कधीं मिळणार नाहीं. जाधवरावानीं झालें तरी ज्या

दरबारीं जशी रहा असेल तसेंच वागलें पाहिजे. मुजरा ! ( जाधवराव ताठ्यानें स्तब्ध उभा राहतो. ) तुम्ही खुषीनें मुजरा न कराल तर तो तुम्हांकडून सक्तीनें करवण्यांत येईल.

**जाधव०:**—हें शीर धडापासून तुटून पडलें तरी बेहेत्तर ! पण जर तें लुखजी जाधवराव यांचें असेल तर या भोंसल्यापुढें तें कधीं कधीं वांकणार नाहीं !

**निजाम:**—( चवताळून ) भर दरबारांत आमची बेअदबी करणाऱ्या इसमाचा काय मुलाजा आहे ? चोपदार, वांकवा जाधवरावाची मान ! ( चोपदार जाधवरावाजवळ जातो. जाधवराव व त्यांचे अनुयायी तरवारी उपसतात. दरबारचे लोक तरवारी उपसून जाधवरावावर चालून जातात. )

**शहाजी:**—थांबा ! थांबा ! भरदरबारांत काय हा अतिप्रसंग ! ( जाधवरावाजवळ धांवत जातो. ) तरवारी म्यान करा !

**जाधव०:**—( शहाजीस ) उठलांत का तक्तावरून ! झालें माझें काम ! ( निजामशहास घाई घाईनें कुरनिसात करितो. ) हुजूर, या नादान भोंसल्याला माझ्याकडून मुजरा करवून माझी मुद्दाम नाचक्की करावी अशी इच्छा आपण केली ही गैर इनसाफाची गोष्ट खुदाला मानवली नाहीं, याबद्दल खेद मानूं नये. शहाजीला तक्तावर बसवून घेण्यासारखी याची काय लायकी आपण पाहिली हें समजत नाहीं ! हा आपला दगलबाज वजीर माझा मुलगा छत्रपति होणार असा मुलखांत डांगोरा पिटीत आहे, आणि असल्या भयंकर फितुरी मनुष्याला नतीजा द्यावा तें न करतां उलट हुजूर त्याला वजीरात देतात ! बडी ताजूबकी बात है !

**निजाम:**—( स्वगत ) आला तुझा कावा माझ्या ध्यानांत ! ( उघड ) तुम्ही काय म्हणतां तें मला समजलं नाहीं.

**जाधव०:**—हा भोंसला म्हणतो कीं माझा मुलगा छत्रपति होणार आणि पृथ्वीवरच्या सर्व राजांना आपल्या ताब्यांत वागवणार ! छत्रपति म्हणजे बादशहा !

**निजाम:**—( शहाजीस ) वजीर, जाधवराव म्हणतात ही गोष्ट खरी आहे ?

**शहाजी:**—होय खावंद. कोणा साधूनें तसें मला सांगितलें आहे व त्यामुळें मी तें खरें मानतों.

**निजाम:**—खुदा करें और वैसाही हो जाय !

**जाधव०:**—( आश्चर्यानें ) खुदा करें और वैसाही हो जाय ! या बेइमान वजीराचा हा दुष्ट इरादा हुजूरला मंजूर आहे काय ?

**निजाम:**—अलबत मंजूर ! जाधवराव, तुम्हीं सांगितल्याप्रमाणें जर माझ्या वजीराचा मुलगा बादशहा होईल तर मी शाहेनशहा म्हणजे बादशहांचा बादशहा होईन. आणि दिल्लीच्या शहाजानापेक्षां माझा दर्जा वरिष्ठ होईल. कारण तो नुसता बादशहा आहे आणि मी बादशहांचा बादशहा होणार ! असें झाल्यावर माझ्या राज्याच्या कायमपणाची आणि श्रेष्ठतेची शोभा काय विचारावी ! वजीर, खुदानें तुम्हांवर मेहेरनजर केली याबद्दल आम्ही फार खूष झालों आहों.

**जाधव०:**—(स्वगत) काय करावें याच्या बेअकलीपणाला ! याच्या कल्याणाची गोष्ट मी सांगतों तीही या मूर्खाला कळत नाहीं !

**शहाजी:**—हुजूरच्या इच्छेप्रमाणें मला मुजरा करण्याचें जाधवरावांनीं आज चुकवलें आहे; हरकत नाहीं. त्यांनीं खूप लक्षांत ठेवावें कीं, माझा छत्रपति मुलगा जन्मास येईल तेव्हां त्यापुढें मी त्यांजकडून मुजरा करवीन तरच मी नांवाचा शहाजी भोंसला !

**जाधव०:**—( तिरस्कारानें ) असली पोकळ बडबड करणारीं शेकडों पोरें मीं खेळवलीं आहेत ! शहाजी भोंसले ! तुम्हां कुणब्यांच्या घरांत जन्मास येणारें पोर छत्रपति कोठून होणार ? तें छत्रपति होण्याऐवजीं तुमच्या आजाप्रमाणें मी त्याला क्षेत्रपति बनवीन तरच मी नांवाचा लुखजी जाधवराव !

**निजाम:**—राहूं द्या राहूं द्या ही वाटाघाट ! जाधवराव, तुम्हीं इथे येण्याची कशासाठीं तखलीफ घेतलीत तें सांगा.

**जाधव०:**—अलीकडे राज्यकारभारांत आपण जी घालमेल केली आहे ती मोंगलसरकारला बिलकूल नापसंत असून त्या बाबतींत त्या सरकारची काय इच्छा आहे ती कळवण्यासाठीं मी आलों आहें.

**निजाम:**—मोंगलसरकारची इच्छा कळवण्यासाठीं आलांत ! मोठीच मेहेरबानी ! बरें बरें ! काय मोंगलसरकारची इच्छा आहे ती कळूं द्या तर खरी !

**जाधव०:**—इच्छा नुसती ऐकून घेणार असाल तर त्याचा काय उपयोग ? त्या इच्छेप्रमाणें आपण अम्मल करणार कीं नाहीं हेंही मला कळलें पाहिजे. यासंबंधानें या भेटींत मला कांहीं कमजास्त बोलावें लागेलसें दिसतें.

**निजामः**—ठीक आहे. काय मनांत असेल तें निर्धास्तपणें बोला. ऐकून घेतों.

**जाधव०**:—शहाजी भोंसल्याला या राज्यांतून काढून लावावें असा मोंगल-सरकारांतून वारंवार इशारा मिळाला असतां आपण ह्या इशाऱ्याचा काय निकाल लावणार तें मला समजलें पाहिजे.

**निजामः**—ज्याला आमच्या राज्यांतून काढून लावावें म्हणून मोंगल बादशहाचे मगरूरीचे निरोप येतात त्याला आम्हीं वजीर नेमून निजामशाहीचा सर्व अखत्यार त्याचे हवालीं केला, यांतच मोंगल बादशहानें काय तें माझें उत्तर समजावें. आणखी निराळें उत्तर कशाला पाहिजे !

**जाधव०**:—हुजूर, मी येथून गेल्यापासून या दरबारची स्थिति फार वाईट झाली आहे. राज्याच्या बेहत्तरीकरितां शहाजीसारख्या छोटेखानी उमरावाला जेथें वजीरीचा अधिकार द्यावा लागतो, आणि असल्या मनुष्यानें तक्ताच्या पायरीलाही पाय लावलेला खपवून घ्यावा लागतो, तेथें निजामशाहीची आणखी कोणची दैना व्हावयाची राहिली आहे ! हुजूर, शहाजीसारख्या फटिंगाच्या नादीं लागून मोंगलांशीं वैर संपादून आपण या थरास गोष्टी आणल्याचें पाहून मला फार वाईट वाटतें ! आतां मोंगल सरकारची चाकरी सोडून पूर्वीप्रमाणें हुजूरच्या खिजमतीस हजर होण्याकरितां मी आपण होऊन आलों आहें. वजीरीचा अधिकार मला द्यावा म्हणजे मोंगल वगैरे सर्व शत्रूंचा मनांतला किलाफ नाहींसा होईल आणि आपणास ऐषआरामांत राहतां येऊन आपल्या दौलतीची बढती होईल, आणि सर्व राज्य निर्धास्त आणि सुखी होईल. शहाजीला नोकरींतून काढूं नये अशी हुजूरची मर्जीच असेल तर त्यानें खुशाल माझ्या हाताखालीं वागावें. पूर्वीपासून तो माझ्या पदरचाच आहे. दरबारांत माझ्या मागें उभे राहण्याचा त्याचा मान आहे त्याप्रमाणें तो रहात जाईल.

**शहाजीः**—जहागीर खायची एकाची आणि नोकरी करायची त्याच्या दुस्मानाची, ही निमकहरामीची विद्या जर वजीरीच्या कामाला लागत असेल तर ती माझ्या अंगीं नाहीं, आणि जाधवरावांच्या अंगीं पूर्णपणें आहे, हें मला कबूल आहे.

**निजामः**—वजीर, तुम्ही स्वस्थ रहा. जाधवरावांना जितकें बोलून घेण्याची हौस असेल तितकें बोलून घेऊं द्या. ते आहेत आणि मी आहें. जाधवराव, चालूं द्या तुमचें !

**जाधव०:**—( रागानें ) चालूं द्या काय ? निमकहरामी हा शब्द तरवारीची खडाजंगी होण्याचा आहे.

**शहाजी:**—मग होईना खडाजंगी आतांच ! इथे कोणी हातांत कांकणें भरलीं आहेत ? निमकहरामी हा शब्द मी एकदां नव्हे, दहादां म्हणेन. निमकहराम !

**जाधव०:**—( दांत ओंठ चावून ) कायरे पोरा ! इतक्यांतच वजीरीची मस्ती अंगांत आली म्हणून असा बेफाम झाला आहेस ! याच क्षणीं तुझी मस्ती उतरतों. मग त्यांत पोरगी रंडकी झाली तरी बेहेत्तर !

**शहाजी:**—( उपहासानें ) ती तुमच्या शब्दांनीं रंडकी होण्याजोगी असती तर कधींच झाली असती. हाताच्या पराक्रमानें रंडकी करायची म्हणाल तर त्याला सात जाधवरावांचे एकवीस जन्म पाहिजेत !

**निजाम:**—शहाजीराजे, याउपर जाधवरावांशीं भांडणाचा एकसुद्धां शब्द बोलाल तर तुम्हांला माझ्या नांवाची द्वाही आहे ! जाधवराव, तुमचें सर्व बोलणें ऐकून घ्यायचें मीं कबूल केलें आहे. काय तें लौकर बोला आणि निरोप घ्या.

**जाधव०:**—खावंद, बारा हजार स्वारांची मनसब आणि तीस लाखांची जहागीर अशा इतमामानें पूर्वीं मीं व माझ्या वडिलांनीं या सरकारची चाकरी बजावलेली आहे. ज्यावेळीं मलिकंबराचें नांवसुद्धां कुणाला माहीत नव्हतें, त्यावेळीं हें निजामशाही राज्य या जाधवरावानें आपल्या बाहुबळावर सांवरून धरलें होतें. आतां हे शहाजी भोंसले मलिकंबराच्या आश्रयानें छोट्याचे मोठे होऊन सरदारी पावले. बडे लोकांत मिरवूं लागले, आणि वजीरीची शेखी गाजवूं लागले ! पण या—या शहाजी भोंसल्याचा आजा बाबाजी पाटील कुळंबावा करीत होता आणि खांद्यावर आसूड टाकून नांगर हांकीत होता ! आणि या—याच शहाजीचा बाप मालोजी भोंसला दरमहा पांच होनांची तैनात घेऊन माझ्या देवडीवर पहारा जागवीत होता ! असल्या या नांगऱ्या पाटलाच्या नातवाला आणि कंगाल शिपुर्ड्यांच्या पोराला खावंद आपण होऊन सर्वांत श्रेष्ठ असा वजिरातीचा अधिकार देऊन सर्फराज करतात, आणि तोच अधिकार मी—मी जाधवराव मागत असतां देत नाहींत याचा अर्थ काय ?

**शहाजी:**—मी पाटलाचा नातू, आणि बारगिराचा मुलगा असतांही केवळ माझ्या करामतीच्या जोरावर प्यायाचा फर्जी झालों यांतच माझा सर्व गौरव होऊन

चुकला आहे ! जाधवराव हे बडे बापके बेटे या नात्यानें वजीरीवर हक्क सांगतात, खुशाल सांगोत ! मला म्हणजे या अधिकाराची आशा आहे असें नाहीं. खावंदानीं तो वाटेल त्याला द्यावा !

**निजाम**:—जाधवराव, तुमचें बोलणें मीं ऐकून घेतलें. तुम्ही मोंगलांच्या तर्फेनें येथें येऊन आमची वजीरी करणार, आणि या राज्याचा बंदोबस्त करणार, हाच तुमचा इरादा दिसतो. परंतु मला मोंगलांच्या ओंजळीनें पाणी प्यायचें नाहीं; आणि माझ्या कारभारांत मला तुमच्या मिनतवारीचीही जरूर नाहीं. शहाजी-राजानीं वजीरीचें काम सोडलें तर मग तुम्हांला बोलावणें करण्याची गोष्ट ! त्याचें पुढें पाहतां येईल. आज तुमच्या नोकरीची मला गरज नाहीं.

**जाधव०**:—सुलतानसाहेब, मी तुमच्या दारांत भीक मागायला आलेला नाहीं ! तर तुम्ही मला वजीर नेमलेंच पाहिजे असें सांगण्याकरितां आलों आहें. बृहस्पतीची बरोबरी करणारे ज्याचे बुद्धिमान मंत्री, दिग्विजय करणारे ज्याचे सेनापति, असे शहाजहान बादशहा केवळ ईश्वराचे अंश समजले जातात. त्यांचा दुर्निवार पराक्रम मला वजीर नेमण्याची आणि शहाजी भोंसल्याला राज्यांतून हद्दपार करण्याची तुम्हांला ताकीद देत आहे. तुम्हांला राज्य करायचें असेल तर तें याच शर्तीवर करूं देण्यांत येईल. ही ताकीद तुम्ही न मानाल तर तुम्हांला शुद्धीवर आणण्यासाठीं सेनापति इसामिय्याची पन्नास हजार मोंगलाई फौज दक्षिणेंत येऊन धडकली आहे, ती सत्वर येऊन तुमच्या राजधानीला गराडा घालील आणि तुम्हांला कैद करील. यावर तुमचें काय म्हणणें आहे तें याच बैठकीला मला कळलें पाहिजे.

**निजाम**:—जाधवराव, तुमचा शहाजहान बादशहा म्हणजे कांही अस्मान फाडून आलेला नाहीं ! माझ्या वडिलांनीं मोंगलांची खुशामत करून हें राज्य मिळवलेलें नाहीं. तें त्यांनीं तरवारीच्या जोरावरच मिळवलें आणि मी झालें तरी तरवारीच्या जोरावरच तें राखणार. तुम्ही माझाच तुकडा खाऊन माझ्या दुस्मानापुढें शेंपूट हालवतां आणि माझ्यावरच भुंकतां यांतच तुमची काय किंमत ती दुनियेला कळलीच आहे ! जा ! चालते व्हा !

**शहाजी**:—खावंद, मोंगलांशीं लढाई द्यायला मी भितों अशांतला अर्थ नाहीं. तथापि माझ्या अभिमानाला पडून आपण मोंगलांशीं वैर संपादावें आणि राज्याला

धोका उत्पन्न करावा, हेंही ठीक नाहीं. जाधवराव म्हणतात तसेंच कां होईना ? मला आपण निरोप द्यावा. मी दुसऱ्या कोणा राजाच्या सावलीस राहून पोट भरीन. अथवा स्वतंत्रपणें मनगटाच्या जोरावर निर्वाह करण्याचेंही सामर्थ्य माझ्या अंगांत आहे. कोणच्याही स्थितींत मी असलों तरी आपण हांक मारल्याबरोबर मी पाठीशीं उभा आहें असें आपण समजावें.

**निजामः**—राजे, राजे, काय मी मोंगलांचा बंदीवान आणि नामधारी सुलतान होऊन राहूं म्हणतां ? नाहीं नाहीं ! एक तर मी स्वतंत्रपणें राज्य करीन, नाहींतर समरांगणांत तरवार गाजवून मरून जाईन. आणि तेंही घडून न येईल तर फकीर होऊन जंगलांत मठी बांधून आयुष्याचे दिवस घालवीन ! या तीन गोष्टींखेरीज चौथी गोष्ट मला पुरवणार नाहीं. या हरामखोर जाधवरावाच्या संगतीपेक्षां जंगलांतले वाघ, सिंह, लांडगे यांचीसुद्धां संगत फार फार बरी !

**शहाजीः**—खुदावंत, जर आपला असाच निर्धार असेल तर मीही जाधवरावांसमक्ष आपणाला वचन देतों कीं, माझें सर्वस्व किंबहुना माझा प्राणही गमावण्याचा प्रसंग आला तरी मी तो खुषीनें गमावीन, पण मोंगलांच्या प्रतापाची झळ आपल्या केसालासुद्धां लागूं देणार नाहीं !

**जाधव०ः**—( उठून ) तर मग मी चाललों इथून ! पण जातांना निक्षून बजावतों कीं, सुलतान मूर्तिजा निजामशहा ! तुमची कारकीर्द संपायची वेळ नजीक आली हें पक्कें समजा ! तुमच्या पूर्वीचा सुलतान बहादुरशहा याची हाडें ग्वालेरच्या किल्ल्यांत कैदखान्यांत कुजत पडलीं आहेत, त्यांच्या सोबतीकरतां तिकडे तुमची रवानगी लौकरच करण्यांत येईल.

**निजामः**—( चवताळून ) हरामजादा ! आज जीभ फार लांब केलीस ! पण तुला इथून जिवंत जाऊं देणार नाहीं ! ( तरवार उपसून जाधवरावाच्या अंगावर धांवतो. शहाजी त्याला आवरतो. दरबारी लोकांत गडबड होते. पडदा पडतो. )

---

# प्रवेश ३ रा.



**स्थलः—**सिंदखेड—जाधवरावांचा वाडा.

इसामिय्याच्या राहण्याची जागा.

( कमालखान येतो. )

**कमालः—**( डोळे वटारून खांबास उद्देशून ) अरे शहाजी, तूं मोठा तलवार-बहाद्दर म्हणवतोस, तर होऊं दे तुझी माझी लढाई ! काय ? लढत नाहींस ? तर मग दे शरणचिठी लिहून ! नाहीं देत लिहून ? तें नाहीं चालायचें ! दे लिहून ! छोडनेकी बात नाहीं ! बोलत नाहींस ? असा खांबासारखा मोठ्या आढ्यतेनें उभा राहिलास तरी मी तुला भ्यायचा नाहीं. पहा, पहा आतां माझ्या पट्टयाचा हात किती सफाईचा आहे तो ! ( म्यानासकट पट्टयाचा वार खांबावर करितो. ) ( आश्चर्यानें ) अजून नाहीं तुझी गर्दन तुटली? हा कंदाहारचा पट्टा नाहीं कामाचा ! तुला खुरासानी पट्टाच पाहिजे. ( म्यानासकट दुसऱ्या पट्टयाचा वार करतो. ) काय ! अजून तुझी गर्दन तुटत नाहीं ? तर मग काय तुला सैतान म्हणावें ! कुच फिकीर नहीं ! सैतान अस कीं कोणी अस ! दोन्ही पट्टयांचा मारा केल्यावर तूं मेलाच पाहिजेस ! ( खांबावर म्यानासकट पट्टयांचे वार करतो. इसामिय्या "काय दंगा आहे" असें ओरडत धाईनें येतो. )

**इसामिय्याः—**कोण ? कमालखान ! अरे हें काय करतो आहेस ?

**कमालः—**मिय्याजी, तुम्हांला बाहेर येण्याला अवकाश होतासें वाटलें, म्हणून शहाजीशीं माझी लढाई व्हायची आहे तिची तालीम फावल्या वेळांत करीत होतों ! हा शहाजी बडा लढाऊ दिसतो ! कंदाहारी पट्टा, खुरासानी पट्टा दोन्ही पट्टयांचे वार चालवले तरी जाग्यावरून हालतसुद्धां नाहीं. ! क्या अजब बात है !

**इसामिय्याः—**( हंसत ) कमाल, हा खांब आहे. शहाजी नव्हे ! हा जाग्या-वरून हालेल कसा ? आणि तूंही म्यानासकट पट्टा खेळणारा अजब शिपाई दिसतोस ! अरे, म्यानानें जर कामें होतील तर पट्टे कशाला हवे होते ?

**कमालः—**( हंसत ) हो. हो. चुकलें खरें. पट्टयांना म्यानें आहेत हें माझ्या लक्षांतच नाहीं राहिलें ! बरें ! हरकत नाहीं. आतां म्यानें काढून पुन्हां दोन्ही पट्टे चालवतों.

**इसामिय्याः**—अरे, राहूं दे, राहूंदे तुझी ती पट्टयांची सफाई ! शहाजीची प्रत्यक्ष गांठ पडेपर्यंत वाट पाहशील कीं नाहीं ?

**कमालः**—( त्रासून ) हेंच तें ! तुम्ही माझा नेहमीं अस्सा हिरमोड करतां ! मला तर बुवा आतां अगदीं जिवाचा कंटाळा आला ! वाट पहायची तरी किती दिवस ? तलवार, बंदूक, जंबिया सारीं हत्यारें घांसून पुसून साफ ठेवावीं, लढाईच्या तयारीनें वाट पहात बसावें, आणि शहाजी भोंसल्यानें तोंड चुकवीत असावें, मुळीं माझ्या दृष्टीसच पडूं नये, अस्सें सारखें चाललें आहे ! मिय्याजी, माझ्या अंगांत वीरश्री आली म्हणजे एक देखील माणूस जवळ फिरकत नाहीं हो ! मग लढावें कुणाशीं ! भिंतीला टकरा मारून कपाळाला टेंगळें आलीं ! खांबाला धक्क्या मारून दंड सुजले ! अस्से माझे हाल चालले आहेत. बरें, म्हटलें, तुम्हांला तरी दया येईल आणि तुम्ही तरी माझें काम कराल, पण तेंही घडत नाहीं ! मग भोंसल्याची शरणचिठी माझ्या हाताला येणार कशी ?

**इसामिय्याः**—कांरे बाबा, आतां माझ्या नांवानें कां खडे फोडतोस ? भोंसल्याच्या शरणचिठीचें तूं आणि जाधवराव पाहून घ्या ! मला कां उगीच सतावतो आहेस ?

**कमालः**—भोंसल्याची आणि माझी जाधवराव गांठ घालून देणारना ? समजले, समजलें त्यांचें कपाळ ! तसें त्यांच्या मनांत असतें तर दौलताबादेस जातांना मला त्यांनीं बरोबर नसतें का नेलें ? मिय्याजी तुमको एक सच बात कहता हूं. भोंसल्याशीं भांडायचा जाधवरावांनीं किती जरी देखावा दाखवला, तरी तुम्ही फसूं नका. हे भोंसल्याशीं लढायचे नाहींत ! अगदीं काळ्या दगडावरची रेघ ! यांनीं त्या शहाजी भोंसल्याला कधींच शरणचिठी लिहून दिलेली आहे !

**इसा०ः**—काय बडबड चालवली आहेस ही ! माझें तर डोकें दुखूं लागलें.

**कमालः**—मीं बडबड चालवली आहे म्हणतां ! शरणचिठीचा पुरावा तुम्हांला दाखवून दिल्यावर मग काय म्हणाल ?

**इसामिय्याः**—चूक कबूल करीन. दाखव पुरावा !

**कमालः**—हरकत नाही. ऐका. शहाजीची बायको जिजाऊ का खिजाऊ कोण म्हणतात ती इथे आली आहे ना ?

**इसामिय्याः**—बरें मग ?

**कमालः**—ती आढ्यतेनें बादशहाप्रमाणें छत्र, मोर्चेल डोक्यावर घेऊन जाधवरावाच्या वाड्यांतून मिरवते आणि जाधवराव तर कांहीं हूं का चूं करीत नाहींत ! हें भोसल्याला शरणचिठी लिहून दिल्याचें लक्षण नव्हे तर काय ?

**इसामिय्याः**—( स्वगत ) शाबासरे पठ्ठया ! अगदीं वेळेवर किती उपयोगाची ही बातमी मला दिलीस ! जाधवरावांकडे तुला चाकरी जोडून दिली त्याचा नामी उपयोग झाला ! ( उघड ) अरे असले भलतेच कुतर्क काढूं नकोस. तूं सांगतोस ती गोष्ट या वाड्यांत घडत असेल तर फारच गैरशिस्त आहे. इतकेंच नव्हे, तर तो मोठा गुन्हा होत आहे. पण तो जाधवरावांना न कळून होत असल्यामुळें त्याचा दोष त्यांजकडे नाहीं. आतां ही गोष्ट मी त्यांचे कानावर घालीन आणि पुन्हां असला गुन्हा इथे न होऊं देण्याचा ते बंदोबस्त करतील.

**कमालः**—आतां मला जाधवराव नकोत, आणि तुम्ही नको ! मीच पुन्हां शहाजीकडे जातों आणि त्याला लढाईला खेंचतों, नाहीतर शरण चिठी लिहून घेतों !

**इसा०ः**—अरे, तसले भलतेंच काम करूं नकोस. कुठे तरी फुकट पुन्हां मार खाशील ! तुझें हें भोंसल्याचें काम मी आणि जाधवराव पाहून घेतों. तूं दिल्लीला परत जा कसा !

**कमालः**—( रागानें ) कशाला जायचें त्या भिकार दिल्लीला ? मोंगल बादशाहा न्यायी आहेत, शहाणे आहेत, हुशार आहेत, असें कोण म्हणत असतील ते म्हणोत; पण निदान एका बाबतींत तरी मी त्या बादशहांना खराब नादान माणूस समजतों !

**इसामिय्याः**—कायरे ए पागल ! तोंड आटप नाहींतर मलासुद्धां तुझी मिरवणूक काढावी लागेल !

**कमालः**—मिरवणुकीचें काय हो ! ती आतां माझ्या अंगवळणीं पडली. तिचें भय घातलेंत तरी खरें बोलायला मी थोडाच सोडणार आहे ! अहो, एवढे राज्यकर्ते म्हणवतात, आणि रयतेच्या वाजवी हक्काची अशी पायमल्ली ! पैशाला चवलीभार गांजा ! मूठभर पैसे दिले तरी मूठभर गांजा मिळेना ! काय ही अंदाधुंदी ! कोण हा नाहक जुलूम ! अंगाचा कसा अगदीं संताप होऊन जातो !

**इसामिय्याः**—( हंसत ) होय बुवा ! मोंगलाई राज्यांत तेवढा मात्र जुलूम आहे खरा !

**कमाल**:—पण राजकर्त्यांनीं आम्हांवर असा जुलूम कां करावा याचें कारण नाहीं तुमच्या लक्षांत येत ! याचें कारण फक्त हेवेखोरपणा !

**इसामिय्या**:—( आश्चर्यानें ) काय मोंगल बादशहा गांजेकसांचा हेवा करतात ! वा ! हा तर्क गंजिकसानेंच काढावा !

**कमाल**:—खरें पाहिलें तर यांचा आमचा हेवादावा असण्याचें कांहींच कारण नाहीं. यानीं कारभार हांकावा, आम्हीं गांजा फुंकावा ! दोघांना अंमल सारखाच आणि सुखही सारखेंच ! दोघांचे रस्ते निराळे. बारा वर्षांतसुद्धां गांठ पडायला नको ! पण मत्सर जळतो आहेना ! या राज्यकर्त्यांना आमचें सुख पहावत नाहीं, आणि गांजा महाग करून लागतात आम्हां गरिबांचा छळ करायला ! तें कांहीं नाहीं, मिय्याजी, मला आतां तुमच्या दिल्लीचें तोंड नको पहायला ! त्यापेक्षां हा दखनचा मुलूख बहुत बहुत उमदा ! इथे पैशाला झोळीभर गांजा ! भांडार भरपूर ! दुनिया आबादीआबाद रहती है. एवढें हें शहाजी भोंसल्याच्या शरणचिठीचें काम जिवाला चटका लावून राहिलें आहे, यांतून एकदांचा मोकळा झालों म्हणजे बसले धुमी पेटवून मजा मारीत !

**इसामिय्या**:—एकूण भोंसल्याची आणि तुझी लढाई व्हायला पाहिजे एवढेंच तुझें काय तें म्हणणें ! हरकत नाहीं. जाधवरावांना भेटून तूं याबद्दल आणखी एकदां त्यांजवळ गोष्ट काढ, म्हणजे तुझें काम होईल. जा आतां.

**कमाल**:—नाहीं बुवा ! मी तुम्हांखेरीज नाहीं बोलायचा. ते रागें भरले तर ? ( पाहून ) ते पहा आयतेच इकडे येताहेत ! आतां काढतो माझें बोलणें.

**इसामिय्या**:—आतां नको बोलूं. पुन्हा केव्हां तरी बोल. जा.

**कमाल**:—मी बोललों, आणि ते मला मारूं लागले तर ?

**इसामिय्या**:—काय चेंगट प्राणी आहेस तूं ! ते मारूं लागले तर मी त्यांचा हात धरीन. झालें आतां ? ( त्यास ढकलून घालवतो; तों दुसरीकडून जाधवराव येतो. )

**जाधव०**:—मिय्याजी ! फौज ! फौज ! मोंगलाई फौज इथें लवकर आली पाहिजे. माझ्या फौजेला बोलावणें आजच गेलें आहे. तुमचीं आमचीं सैन्यें इथे दाखल झाल्याबरोबर दौलताबादेवर मोहीम ! आतां दुसरें बोलणें नाहीं.

**इसामिय्याः**—माझी फौज खानदेशांत आली आहे ती ताबडतोब इथे येईल. त्याची काळजी नको. तुम्ही आपले लोक जमवा. दौलताबादेवर चालून जाऊं आणि शत्रूची दाणादाण करून टाकूं. त्याची काय एवढी बिशाद आहे! राजेसाहेब, सुलतान तुमचें ऐकणार नाही; आणि शहाजीला घालवून देणार नाही, असें मी पूर्वीपासून म्हणतोंच आहें. तुम्हांला मात्र स्वतःच्या दराऱ्याचा भ्रम होता तो आतां दूर झाला हें एका अर्थी बरेंच झालें. शत्रूला तुच्छ लेखून त्याची हेळसांड करण्याची जी तुम्हांला संवय आहे ती जर या दौलताबादेच्या प्रसंगानें गेली असेल तर फारच उत्तम झालें असें मी म्हणेन.

**जाधव०ः**—नाही. मिय्याजी, माझे पूर्वीचे ग्रह आतां राहिले नाहींत. ते साफ बदलले आहेत. छत्रपति जन्मास येणार म्हणून शहाजीनें बातमी पसरली ती अवलपासून अखेरपर्यंत सारे ढोंग आहे असें आपण समजत होतों आणि त्याची टवाळी करीत होतों, पण तिथे चौकशी केली तींत असें दिसून आलें कीं, ही गोष्ट या मुलखांत बहुत लोक खरी मानतात. शहाजीचा आणि त्याच्या मुलाचा आश्रय केला तर आपण स्वतंत्र राज्य करूं, मोंगलाचें राज्य धुळीला मिळवूं, तमाम हिंदुस्थानांतले सुभे व राज्यें व संस्थानें यांचे धनी होऊं, बडे सरदार होऊं, अपार संपत्ति मिळवूं, असल्या आशांनीं वेडे बनलेल्या लाखों लढाऊ मराठ्यानीं शहाजीच्या भजनीं लागावें यांत नवल नाहीं. छत्रपतीचें वर्तमान मूळचे खोटे असलें तरी इतक्या लोकांनीं तें खरें मानले त्याअर्थी तें अखेरीस खरेंच ठरणार अशी मनाला दहशत वाटते.

**इसामिय्याः**—बरोबर आहे. या बाबतींत तुमचें आमचे मत आतां तंतोतंत जुळले. या गोष्टी मी परस्थ असतां इथे आल्याबरोबर मला ताडतां आल्या, आणि तुम्हांला चांगली ठेंच लागल्यावर इतक्या उशीरानें कळल्या, इतकाच काय तो फरक!

**जाधव०ः**—सवात आश्चर्याची गोष्ट ती अजून सांगायचीच आहे. शहाजीचा पोर छत्रपति झाला तर प्रथम तो तुला मारून तुझें राज्य घेईल याचा काय विचार योजलास; म्हणून मी सुलतानाला विचारायला गेलों, तर तें खुळे पोर म्हणतें कीं बरेंच झालें; मी शाहेनशहा होईन; दिल्लीचे बादशहा तर नुसते बादशहा! मी त्याहून वरिष्ठ बादशहांचा बादशहा होणार! कां? आहे कीं नाहीं मूर्खपणाची कमाल?

**इसामिय्याः**—मला नाहीं त्यांत त्याचा मूर्खपणा वाटत ! हें पहा, शहाजीचें ढोंग तुम्हां आम्हांप्रमाणें सुलतानसुद्धां जाणून आहे. पण या ढोंगापासून जर तूर्त त्याचा मोठा फायदा होतो आहे, शहाजीसारख्या सरदाराची व त्याचे नादीं लागलेल्या हजारों मराठ्यांची चाकरी आयती फुकट मिळते आहे, तर तो कशाला तें ढोंग म्हणून कबूल करतो आहे ? चार दिवस वेडे लोकांबरोबर आपण वेड पांघरून नाचावें आणि होईल तो फायदा पदरांत पाडून घ्यावा, पुढें व्हायचें तें होतेच आहे, हेंच सुलतानाच्या मसलतीचें धोरण दिसतें; आणि त्याच्या दृष्टीनें तें शहाणपणाचें आहे.

**जाधव०ः**—सुलतानाकडून असा कानाडोळा होऊं लागल्याबरोबर आपल्या ढोंगाची टिमकी वाजवण्यांत शहाजीचा निर्भयपणा काय विचारावा ! तो भर दरबारांत मला–प्रत्यक्ष महाराजा लुखजी जाधवरावाला–बजावतो कीं, माझा मुलगा छत्रपति होणार ! आणि त्यापुढं मुजऱ्याकरितां मी तुमची मान वांकवणार ! असें घडवीन तरच नांवाचा शहाजी भोंसला ! ते त्याचे शब्द माझे काळजाला एकसारखे झोंबताहेत !

**इसामिय्याः**—असें बोलला तो ? राजे, काळ विपरीत आला ! दुनियाच उलटी फिरली, तेव्हां काय बोलायचें ?

**जाधव०ः**—मीही पण त्याला रोख तिथच्या तिथेच जबाब दिला कीं, कुणब्याच्या कुळांत छत्रपति कोठून उदयास येणार ? तुझ्या आजाप्रमाणें तुझा पोर छत्रपति न होतां क्षेत्रपति मात्र होईल खरा ! ज्याला तूं छत्रपति बनवणार त्याला मी क्षेत्रपति बनवीन तरच मी नांवाचा लुखजी जाधवराव !

**इसामिय्याः**—वाहवा ! खासें खासें उत्तर ! अशा उर्मट माणसाचें असेंच जागच्या जागीं नाक ठेचलें पाहिजे. ठीक झालें.

**जाधव०ः**—बोलून गेलें खरा, पण बोलणें फोल ठरलें तर बोलल्याचें चीज काय राहिलें ? माझे शब्द फोल होऊन दुर्दैवानें शहाजीचीच भाषा खरी ठरली तर माझी काय दशा होईल ? मानी वीराला मानापेक्षां जगांत काय प्रिय आहे ? कीर्तिवंताला अपकीर्तीपेक्षां इहलोकीं अधिक भयंकर नरक कोणचा आहे ? संभाविताला अपकीर्तीपेक्षां मरण शंभर पटीनें बरें ! शहाजीच्या शब्दांचें स्मरण झालें म्हणजे

अंगाची होळी होते, आणि जिकडे तिकडे तो छत्रपति दिसूं लागतो ! केव्हां एकदां तें जिजीचें पोर पकडून कुठे सप्तपाताळांत दडवून ठेवीन असें मला झालें आहे.

**इसामिय्याः**—( स्वगत ) दडवून ठेवण्यापेक्षां गाडून टाकलेंस तर सारीच कटकट चुकेल ! ( उघड ) होय होय. राजेसाहेब, तें पोर आमच्या हातीं लागल्यावर शहाजीचा बंडावा थंड पडलाच समजा ! बहुतेक काम आपोआप भागेल. अशा सुलभ रीतीनें शहाजीचें बंड मोडून निजामशाही राज्यांत आम्हांला स्वस्थता करतां आली तर माझी मोठी वाहवा होईल, आणि बादशहांकडून तुम्हांला बहुत सर्फराज केलें जाईल.

**जाधव०:**—सारें खरें, पण शहाजीचें पोर आमच्या हातीं लागावें कसें एवढीच काय ती पंचाईत !

**इसामिय्याः**—पंचाईत कांहीं नाहीं. जिला छत्रपति होणार ती शहाजीची बायको तुमच्या घरांत हल्लीं आहेच. बाळंत होईपर्यंत तिला इथेच राहूंद्या.

**जाधव०:**—ती कुठची रहायला ?

**इसामिय्याः**—न राहील तर तिच्या जाण्याला प्रतिबंध केला पाहिजे. हें काय ? ती बाळंत होऊन मुलगी झाली तर उत्तमच झालें. मुलगा झाला तर त्याला ठेवून घेऊन तिला नवऱ्याकडे लावून द्यावें.

**जाधव०:**—पण तिला अटकेंत ठेवायला कांहीं निमित्त पाहिजेना ?

**इसामिय्याः**—कशाला पाहिजे निमित्त ? तुम्ही तिचे हालजाच करीत नाहीं, किंवा तिच्या जिवाला अपाय करीत नाहीं. मुलगा झाला तंरी तोही सुरक्षित तुमच्याच ताब्यांत राहणार. तिचें कोणचें वाईट होतें आहे ?

**जाधव०:**—नाहीं. मिय्यासाहेब, तसें नाहीं करतां येणार ! मुलीवर माझें प्रेम असल्यामुळें मी आढेवेढे घेतों असें समजूं नका. प्रथमपासून माझा ओढा तिच्याकडे फारसा नव्हताच, त्यांत अलीकडे एका बाबतींत तिनें दुराग्रहानें माझी आज्ञा अमान्य केली; त्यामुळें तिच्यावरचें माझें मन अगदींच उडालें. हल्लीं ती येथें आहे, तरी अजून मी तिची विचारपूस कांहींच केलेली नाहीं. असें आहे तरी अनास्थेनें वागवणें निराळें, आणि कैदेंत ठेवणें निराळें. कैदेंत ठेवण्याजोगा अन्याय तिनें कोणता केला आहे ? तिला कैदेंत ठेवायला कांहीं तरी निमित्त पाहिजेना ?

**इसामिय्याः**—( स्वगत ) स्वारी पाप करायला तयार झाली आहे, पण निमित्त धुंडाळते आहे ! मी दाखवून देतों निमित्त ! ( उघड ) शिक्षा करायला तुम्हीं तयार असल्यावर जिजाऊचा अन्याय दाखवून द्यायला कितीसा उशीर ! छत्र आणि मोर्चेल हे बादशाही मरातब वहिवाटण्याचा जिजाऊला काय अधिकार आहे ?

**जाधव०ः**—आपल्या घरी ती वाटेल तें करील. त्यांत मी कशाला मन घालूं ?

**इसामिय्याः**—पण तुमचा वाडा हें कांहीं तिचें घर नव्हे ! हा मोंगलाई राज्याचा भाग आहे. या वाड्यांत जर ती अशी गैरशिस्त वागूं लागली तर तुम्ही तिला शिक्षा करणार कीं नाहीं !

**जाधव०ः**—अलबत करीन. जर तिनें हा गुन्हा केला असेल तर तिला कैदेंत ठेवणें ही शिक्षा फार कमी आहे.

**इसामिय्याः**—( स्वगत ) विश्वासानें घरीं आलेल्या माणसाशीं मी विश्वासघात करणार नाहीं वगैरे यांची पूर्वीची बडबड गेली आतां गांवाला !

**जाधव०ः**—तथापि ती माझीच मुलगी असल्यामुळें बाळंतपणापर्यंत अटकेंत ठेवणें यापलीकडे तिला कांहीं शिक्षा करतां येत नाहीं. मात्र तिनें छत्र व मोर्चेल वहिवाटलेलें मी डोळ्यांनीं पाहिलें पाहिजे.

**इसामिय्याः**—तेंही तुम्हांला दिसेल. माझी बातमी पक्की आहे. ती गुन्हेगार ठरल्यावर तुम्ही तिला अटकेंत ठेविलें पाहिजे.

**जाधव०ः**—ठेवतों. बाळंत होईपर्यंत ठेवतों. आणि तिला मुलगा झालाच तर बाबाजी पाटलाचा नांगर आणि आसूड त्याच्या हवालीं करतों, म्हणजे सर्व लोकांना शहाजीचा पोर छत्रपति झाला कीं क्षेत्रपति झाला हें कळून चुकेल !

**इसामिय्याः**—याप्रमाणें मसलत ठरली तर ?

**जाधव०ः**—होय. पक्की ठरली.

**कमालः**—( मध्येंच प्रवेश करून ) कशी कशी मसलत ठरली ? शहाजी भोंसल्याची आणि माझी लढाई व्हायची ती जागा कोणची ? कोणच्या हत्यारानें लढायचें ? तारीख कोणची मुक्रर केलीत तें बोला, बोला लवकर ! मी पंचहत्यारी कमालखान सांगाल तेव्हां तयार आहें.

**इसामिय्याः**—( हंसत ) अरे कमालखान, शहाजीशीं लढाई तूर्त रहित केली आहे आणि त्याचा मुलगा छत्रपति होणार म्हणतात त्या छत्रपतीशीं लढाई मारण्याचा विचार चालू आहे.

**कमालः**—हरकत नाहीं. राहूं या शहाजी ! छत्रपतीशीं लढाई मारतो !

**इसामिय्याः**—पण छत्रपति अजून आईच्या पोटांत आहे.

**कमालः**—तिथे लपून बसला आहे काय लुच्चा ! चिंता नाही ! आंईचें पोट कापून त्याला बाहेर खेचतों आणि मारून टाकतों !

**जाधव०ः**—( काठी मारतो ) चल गाढवा ! आज फारच बेवकूफ बनला आहेस ! निघ !

**इसामिय्याः**—निघ ! गद्धा अदमी ! ( काठी मारतो. )

**कमालः**—हां. हां. मिय्याजी ! तुम्हीही मारतां !

**इसामिय्याः**—बेवकूफ बनलास ! ( काठी मारतो. )

**कमालः**—( जातां जातां स्वगत ) दौलताबाद काय आणि सिंदखेड काय, कुठेही झाले तरी शहाजीच्या लढाईची गोष्ट काढली कीं, या पठ्ठयाच्या पाठीवर काठ्या बसल्याच ! मग शेवटीं शहाजीकडून शरणचिठीऐवजीं मला मरणचिठी मिळणार की काय न कळे ! ( जातो. )

**जाधव०ः**—( हंसत ) मिय्याजी, हें आस्वल तुम्हीं माझ्या दारांत आणून बांधलें हें बरीच करमणूक करतें, पण केव्हां केव्हां त्रास देतें !

**इसामिय्याः**—त्याला सोपी युक्ति आहे. त्या आस्वलापुढें पोतेंभर गांजा आणि घडाभर काथ्या आणून टाका, म्हणजे तें कधीं त्रास देणार नाहीं ! ( जाधवराव जातो. ) आईचें पोट कापून छत्रपति मारून टाकतों असे त्या गांजेकसानें म्हटलें म्हणून त्याची आम्हीं निर्भत्सना केली, पण या कमालखानाप्रमाणें उतावळेपणानें कार्यनाश करून घेणारे जगांत लोक आहेत त्यांची संख्या कोण मोजील ? कमालखानाप्रमाणें मीं जर जिजाऊला आणून मारून टाक असें जाधवरावाला सांगितलें असतें, तर माझी मसलत तडीला जाण्याची आशाच नव्हती ! पण मी कसला वस्ताद ! धीरे धीरे संधि साधून तिला इथे युक्तीनें आणलें, तेव्हां कुठे माझा डाव हटकून साधायची वेळ येऊन ठेपली ! आतां थोडक्यावर आलें आहे. विषाचे चारच थेंब किंवा काळोखांत कट्यारीचा एकच घाव, कीं झालें काम ! मोडलें शहाजीचें बंड ! ( जातो. )

---

# प्रवेश ४.

## सीन. १.

**स्थळः**—सिंदखेड. जाधवरावांचा वाडा.

( देशमुखीण, सुभेदारीण, जुमलेदारीण, पेशकारीण, किल्लेदारीण व उपाध्यीण अशा सहा सुवासिनी व दासी रुक्मिणी येतात. )

**देशमुखीणः**—उपाध्यीणबाई, डोहाळे म्हटले म्हणजे त्यांत नाना तऱ्हा आणि परी असायच्याच ! डोहाळे कोणाला होत का नाहींत ? पण जिजाबाईची तऱ्हा तुम्ही सांगतां ती कांहीं मुलखावेगळीच !

**उपाध्यीणः**—अहो, तें कांहीं विचारूं नका ! देशमुखीणबाई, जिजाबाईला या गर्भारपणांत देवधर्माचें आणि भजनपूजनाचें जें वेड लागलें आहे तें अगदींच विचित्र ! त्यांतच आणखी उठल्या बसल्या लढाईच्या आणि कारस्थानाच्या गोष्टी !

**सुभेदारीणः**—मी म्हणतें, एका परीनें असले डोहाळे आपले फार चांगलें !

**जुमलेदारीणः**—तें कसें काय सुभेदारीणबाई !

**सुभेदारीणः**—अहो, लोकी बायकांचे डोहाळे पहावे तर कुणी खायला, प्यायला, ल्यायला अमुक पाहिजे, तमुक पाहिजे, असें म्हणत असतात, आणि त्यांचे छंद पुरवतां पुरवतां घरच्या माणसांची बेजारगत होते. पण जिजाबाईचें पहावें तों सगळेंच निराळें ! जपाला माळ, देवपूजेला रगड फुलें आणि भजनाला टाळ आणि चाळ आणून दिले कीं संपलें काम ! आतां लढाईच्या गोष्टी म्हणाल तर त्याला हें सुद्धां लागत नाहीं ! मिळून काय तर या डोहाळ्यांना खर्चवेंच नको, कांहीं नको.

**उपाध्यीणः**—( इतर बायकांस ) पहा ! पहा यांचें हें वेड ! अहो जिजाबाईचा देवधर्म फुकाचा का होतो आहे म्हणतां ! तिच्या आग्रहावरून या तीन चार महिन्यांत शहाजीराजानीं किती देवळांचे जीर्णोद्धार केले, क्षेत्रोक्षेत्रीं यात्रेकरूंच्या सोयीसाठीं धर्मशाळा किती बांधल्या, विहिरी किती खोदल्या, पंडितांच्या आणि वैदिकांच्या पाठशाळा चालवण्याकरितां जमिनी किती दिल्या, अग्निहोत्रें किती सुरू केलीं, याची दाद इथे कुणाला तरी आहे का ? अन्नसंतर्पण, दानधर्म, फकीरांना खैरात, हें तर सारें नेहमींच चाललें आहे. मी दौलताबादेहून नुकतीच आलें म्हणून मला

हें सारें ठाऊक. आजकाल तिथे भोंसल्यांच्या वाड्यांत गेलें म्हणजे या कलियुगांत सत्ययुग सुरू झाल्याचा भास होतो आहे ! असे आमच्या जिजाबाईचे डोहाळे आहेत बरें ! ते पुरवायला भोंसल्यांचीच दौलत आहे म्हणून टिकली आहे !

**पेशकारीणः**--तुम्ही सांगतां यावरून पाहिलें तर जिजाऊच्या पोटीं कोणी मोठा पुण्यवान थोर भाग्याचा सरदार जन्माला येणार !

**उपाध्यीणः**--पेशकारीणबाई, नुसता सरदार नव्हे, छत्रपति जन्माला येणार म्हणा !

**सर्वजणीः**--काय ? छत्रपति ?

**उपाध्यीणः**--होय होय. छत्रपतिच जन्माला येणार आहेत बरें ! नेहमीं आमच्या जिजाबाईला चंवऱ्या ढाळून घेतल्याखेरीज आणि डोक्यावर छत्र धरल्याखेरीज करमत नाहीं, हें कशाचें लक्षण समजतां तुम्ही ! अहो, मी म्हणतें तेंच तें !

**किल्लेदारीणः**--छत्र, चंवरी, मोर्चेल असलीं राजचिन्हें आपल्या देवपूजेंत देवांना वाहिलेलीं आपण पहातों. मनुष्यांत असलीं चिन्हें आपल्यावर धरवण्याचा अधिकार एक दिल्लीच्या बादशहांना मात्र आहे अशी आमची समजूत होती, आणि उपाध्यीणबाई, तुम्ही म्हणतां जिजाबाईचा मुलगा हा नवीनच कोणी छत्रपति उत्पन्न होणार ! मला तर नाहीं बाई हें सुधें लक्षण दिसत ! ज्यांच्या देव्हाऱ्यांत बादशहाकडून आलेल्या पत्रांची दररोज पूजा होते, त्या जाधवरावांना आपल्या मुलीचे असले हे वेडगळ छंद खपतील असें वाटतें तुम्हांला ? मोंगलाची जात मोठी करारी आणि खुनशी ! त्यांच्या जर कानावर हें वर्तमान गेलें तर काय दशा होईल बरें !

( म्हाळसाबाई प्रवेश करिते. )

**म्हाळसाः**--होय. होय. बायांनो, तीच माझ्या जिवाला मोठी काळजी लागून राहिली आहे. जिजी कधीं इथे यायची नव्हे ती मीं मोठीं आर्जवें करून बोलावून आणली, त्यासारखी ती धडपणें आपल्या नवऱ्याच्या घरीं परत पोंचली म्हणजे गंगेला घोडे न्हाले ! तुम्हांला हात जोडून प्रार्थना एवढीच करतें कीं, ती माझी मुलगी कांहीं करो, कसेंही वागो, त्याची बातमी तुम्ही बाहेर बोलूं नका. पुरुषांच्या कानावर वर्तमान गेलें तर काय कठीण अवस्था होईल कोण जाणे ! आणखी दुसरी गोष्ट सुचवून ठेवतें. मोंगलांचें

नांव निघालें, म्हणजे जिजी तत्काळ चवताळते, हातवारे करून अद्वातद्वा बोलत सुटते तें ऐकवतसुद्धां नाहीं, म्हणून सांगतें कीं आपली तसली गोष्टच मुळीं तिच्या-समोर वर्ज्य करावी म्हणजे झालें! उपाध्यीणबाई, जा. जिजाऊला म्हणावें, सारी तयारी झाली आहे. बायका खोळंबल्या आहेत. ये लवकर. तुम्ही गेल्याखेरीज ती नाहीं लौकर यायची.

**सुभेदारीण**:—( हंसत ) उपाध्यीणबाईची उपाधी लागल्याखेरीज ती कुठली जाग्यावरून हालायला! ( उपाध्यीण जाते. )

**म्हाळसा**:—चला. आंत चला. ( सर्व जातात. )

## सीन २.

**स्थळ**:—सिंदखेड. जाधवरावांचा वाडा.

( सुवासिनी व म्हाळसाबाई ओंटीचें साहित्य करीत आहेत तों जिजाऊ पांच पायघोळ बुरखा घेतलेल्या यवनी दासींसह येते व आसनावर बसते. यवनी छत्र-चामरादि चिन्हांनीं तिची सेवा करीत उभ्या राहतात. )

**म्हाळसा**:—उपाध्यीणबाई, जिजीची ओंटी भरण्याचा पहिला मान तुमचा; मागून या सगळ्या जणींचा; आणि सर्वांमागून घरची ओंटी मी भरीन. ( उपाध्यीण व पांच सुवासिनी प्रथम आणि मागून म्हाळसाबाई ओंटी भरते. रुक्मिणी ओंटी धरते व वेळोवेळ ओंटी रिकामी करते. )

**देशमुखीण**:—हें ग काय रुक्मिणी, वेडी कुठची! सगळीच ओंटी रिकामी करूं नकोस. जिजाबाईला अजून वडलांना नमस्कार करायला जायचें आहेना? जिजी, तूं मोठी नशीबवान खरी. गर्भारशी मुलींचें वैभव तुला प्राप्त झालें आहे आणि तें पाहून आनंदानें डोंगराएवढे होणारे तुझे ऐश्वर्यशाली वडील तुझें कौतुक करायला तत्पर आहेत. ( म्हाळसाबाईस ) जिजाऊच्या चेहऱ्यावर असें कांहीं गर्भाचें तेज लोटलें आहे कीं, त्यावरून नजर ढळत नाहीं! कशी महालक्ष्मीसारखी दिसते आहे हो! बाईसाहेब, मुलीची दररोज सकाळ संध्याकाळ दृष्ट काढीत जा बरें!

**म्हाळसा**:—( कौतुकानें ) होयना! ही फार छानदार दिसते असें तुम्हांला-सुद्धां वाटतें एकूण!

**देशमुखीण**:—जिजाबाई, तुझ्या या दासी मुक्या आहेत वाटतें! अगदीं अक्षरसुद्धां बोलत नाहींत, हें कसें काय?

**जिजाऊः**—देशमुखीणबाई, त्यांना इकडची भाषा कांहीं समजत नाहीं. त्या मूळ राहणाऱ्या पेशावरकडच्या आहेत. त्यांना धड मुसलमानी देखील येत नाहीं, मग मराठी कुठचें यायला ?

**सुभेदारीणः**—या तुझ्या दासी बायका, आम्ही बायका. आम्हांसमोर यांनीं बुरखे कशाला घ्यायला पाहिजेत ? अगदीं नखसुद्धां दृष्टीस पडूं देत नाहींत ! इतकें कशाला यानीं लाजायला पाहिजे ! काढा म्हणावें तुमचे बुरखे ! पेशावरकडच्या बायका त्या कसल्या असतात तें पाहूं द्या तरी आम्हांला !

**जिजाऊः**—( हंसत ) हो. खरेंच ! ( यवनींस ) हां तुम अपने बुरके निकालो. और अपना हुस्न बेमिसल दिखाकर इन्के दिलोंको खूष करो.

**यवनीः**—बेगमसाहिबा, इस वख्त हमे इस खिजमतसे माफ फरमाइये.

**जिजाऊः**—क्या ? अपने बुरके न निकालोगी ? खैर ! तुमारी मर्जी.

**किल्लेदारीणः**—या पेशावरकडच्या बायका. अंगानें धष्टपुष्ट दिसतात, तशा स्वभावानेंसुद्धां फार आडदांड असतात वाटतें ! तूं बुरखे काढा म्हणतेस आणि या तुझ्या दासी साफ नाही म्हणून सांगतात ! हें काय बाई असलें !

**जिजाऊः**—किल्लेदारीणबाई, नका, नका रागावूं त्या गरिबांवर ! या बुरखे काढीत नाहीत त्यांतला खरा प्रकार काय तो आतां सांगतें. यांच्या सुंदरपणाची मी तारीफ केली ती चेष्टेनें केली. या पराकाष्ठेच्या ओंगळ आणि कुरूप आहेत. इतक्या ओंगळ आहेत कीं, त्यांचे चेहेरे पाहिल्यावरोबर तुम्ही घाबरून पळत सुटाल !

**उपाध्यीणः**—अगबाई, असलें का आहे यांचें रूप ! माझ्या नको बाई दृष्टीस पडायला यांचीं तोंडें ! ( तोंडावरून पदराचा बुरखा घेते. ) [ सर्व हंसतात. ]

**जिजाऊः**—भिऊं नका उपाध्यीणबाई ! आपलीं तोंडें दाखवायची माझ्या दासींना तरी कुठे हौस आहे ! आपलें बुरख्याच्या आंत कांहीं असलें तरी साजरें दिसतें. खरा प्रकार काय आहे तो कोण येतें आहे बघायला !

**म्हाळसाः**—बरें, उपाध्यीणबाई, आजच्या दिवसाचा महिमा डोहाळ्यांचें गाणें म्हणून दाखवायचा आहे. कोण म्हणतें गाणें ?

**देशमुखीणः**—मी म्हणतें. मला येत आहे एक गाणें.

**सुभेदारीणः**—कुणाचे डोहाळे म्हणतां ! रुक्मिणीचे, कीं कौसल्येचे, कीं सीतेचे ?

**देशमुखीणः**—नाहीं. हें निराळेंच नवीन गाणें आहे. ऐका. ( गाते. )

पद

**अजि हौस जिजीची पुरवा । हट गर्भवतीचा पुरवा ॥ धृ० ॥**
**सित छत्र तिच्या शिरिं धरवा । सित चामर सुंदर फिरवा ।**
**गज-शिबिका-यानीं मिरवा । नव भव्य-महोत्सव करवा ॥ १ ॥**
**पाचूहार चुडा हिरवा । हिरवा शालु वेणिंत मरवा ।**
**शृंगार थाटुनि बरवा । प्रियसखिची ओटी भरवा ॥ २ ॥**

**जिजाऊः**—आतां देशमुखीणबाईंनीं गाणें म्हटलें हें दौलताबादेस मीं पुष्कळदां ऐकलें आहे.

**देशमुखीणः**—होय मीं सुद्धां पहिल्यान्दां तिथेंच ऐकलें, आणि मला तें फार गोड वाटलें म्हणून पाठ केलें. आणि आज तें म्हणायला आयतेंच उपयोगी पडलें.

**जिजाऊः**—आई, या गाण्यांत म्हटलें आहे कीं, जिजाईची जी जी हौस असेल ती ती सर्वांनीं अवश्य पुरवावी.

**म्हाळसाः**—होय. बरें मग ?

**जिजाऊः**—माझ्या मनाला एक अतिशय उत्कंठा लागलेली आहे ती तूं पूर्ण करशील का ?

**म्हाळसाः**—( प्रेमानें जिजाबाईचें तोंड कुरवाळून ) हें काय विचारतेस जिजी ! सांग तुझी काय इच्छा असेल ती ?

**जिजाऊः**—सांगूच तर ?

**म्हाळसाः**—सांग. सांग. तुझ्या ओंठाबाहेर शब्द पडायची फुरसत कीं जें तुला पाहिजे तें आम्हीं देतों कीं नाहीं पहा !

**जिजाऊः**—आई, तूं आणि तुझ्या या साऱ्या मानकरणी इथे जमल्या आहेत हें आयतेंच बरें झालें आहे. माझी इच्छा अशी आहे कीं, माझ्या दासीच्या हातून तुम्ही सर्वांनीं छत्र, चंवरी वगैरे राजचिन्हें घ्यावींत आणि त्या करतात तीच माझी सेवा क्षणभर तुम्हीं करावी. ( सर्व बायका एकमेकींकडे आश्चर्यानें पाहतात. )

**म्हाळसाः**—ही बाई तुझी हौस फारच चमत्कारिक ! तूं म्हणतेस तसें करण्यांत अधिक तें काय आहे ?

**जिजाऊः**—अधिक म्हणून एवढेंच कीं, ईश्वरीप्रसादानें माझ्या गर्भाला जीं हीं राजचिन्हें प्राप्त झालीं आहेत तीं तुम्हीं मान्य केल्यासारखें होऊन माझ्या मनाला फार संतोष वाटेल.

**म्हाळसाः**--तूं सांगतेस तें करायला फार अवघड वाटतें. अशी तुझी चाकरी करण्यांत आम्हांला स्वतःला हीनपणा वाटतो असें कांहीं नाहीं, पण हें मोंगलाई राज्य. आम्हीं मोंगलाई सरदार, आमचे छत्रपति दिल्लीचे बादशहा. राजचिन्हें तुझींच आणि दासीही तुझ्याच. गर्भातल्या छत्रपतीची म्हणून तुझी सेवा त्या करतात तें देखील पुरुषांना कळलें तर खपायचें नाहीं. मग तुझ्या दासींचें काम आम्हीं केलें आणि तें बाहेर कळलें तर काय प्रळय होईल याचा तूंच विचार कर बरें! तूं लडिवाळपणानें करायला सांगतेस तें आम्हीं केलें तर बादशहाशीं बेइमानी केल्यासारखें नाहीं का होत? ( जिजाऊ हिरमुसलें तोंड करते. ) नाहीं का तुझी समजूत पडत? आतां काय करावें हिला!

**उपाध्यीणः**—बाईसाहेब, मुलीची हौस, ती घरांतल्या घरांत पुरवायची, त्याला काय हरकत आहे?

**देशमुखीणः**—नको बाई, पुरुषांना कळलें तर आमची धिंड काढतील!

**सुभेदारीणः**—अहो, कोण जातें आहे पुरुषांना कळवायला, आणि काय घेऊन बसलांत तुम्ही! मुलगी म्हणते आहे तर होऊं द्या तसेंच. हा एक आपला घटकाभर खेळच म्हणावा नी दुसरें काय? बाईसाहेब, ध्या तुम्ही हातांत तें छत्र! चवऱ्या, मोर्चेल, पंखा आम्ही घेतों.

**म्हाळसाः**—बरें बाई! जिजे, कोणीकडून तरी आम्हांला तुझी हौस पुरवायची; मग तूं म्हणतेस तसेंच का क्षणभर होईना? ( म्हाळसाबाई दासींच्या हातांतून छत्र घेऊन जिजाऊवर धरते आणि इतर बायका चवऱ्या वगैरे घेऊन जिजाऊच्या भोंवतीं उभ्या राहतात. )

**पेशकारीणः**—उपाध्यीणबाई, छत्रपतीची चाकरी करायची आहे. चाकरी केल्याखेरीज भाकरी मिळत नसते! तुम्ही रिकाम्या काय म्हणून! ती सोन्याची काठी हातांत ध्या आणि जिजाबाईपुढें उभ्या रहा. ( उपाध्यीणबाई खांद्यावर काठी घेऊन उभी राहते. सर्व हंसतात. ) अहो, तशी नाहीं काठी ध्यायची! मुसळ हातांत धरतात तशी धरा आणि मुजरा करा! नाहीं मुजरा करतां येत? म्हणा, "नजर रखो महाराज! नजर रखो महाराज!" ( सर्व हंसतात, जाधवराव एकदम पाय आपटीत प्रवेश करतो. )

**जाधव०ः**—काय बंडाळी माजवली आहे ही! ( सर्व बायका घाईनें तोंडावर बुरखे ओढून चरफडत पळून जातात. )

**म्हाळसाः**—( संतापून ) कोण ही दांडगाई ! काय हा जुलूम ! इथे जिजीची ओटी भरण्याचा समारंभ होतो आहे, गांवांतल्या थोरामोठ्यांच्या बायका जमल्या आहेत, हौस मौज चालली आहे, आणि यावेळीं पुरुषांनीं एकदम जनानखान्यांत घुसायचें आणि समारंभाचा विरस करायचा, म्हणजे काय ? जनानखाना म्हणजे आम्हां बायकांचें राज्य, इथे आम्हीं वाटेल तें करूं. पुरुषांना इथे येण्याचें काय कारण ?

**जाधव०:**—बस्स ! बस्स ! तोंड आटप. तोंड आटप. इथे माझ्या घरांत-सुद्धां डोक्यावर छत्र वगैरे धरवून साम्राज्याच्या मालकीचें सोंग जिजी भोंसली मिरवीत असते असें ऐकलें होतें, पण इथे प्रत्यक्ष पहावें तों त्याच्याही पलीकडे मजल गेलेली ! फाजील मूर्ख बायका ! प्राचीन काळापासून आम्हीं सिंदखेडचे जाधव कुळानें, मानानें आणि पराक्रमानें सर्व मराठ्यांत श्रेष्ठ समजले जातों. बादशाही उमरावांत मी महाराजा लुखजी जाधवराव जयपूर जोधपूरच्या महाराजां-च्या मांडीला मांडी लावून बसत असतों. अशा श्रेष्ठ महाराजाच्या राणीचे अपार ऐश्वर्य भोगणें हें जिचें भाग्य, तिनें आपला दर्जा विसरून कुणब्याच्या बायकोची चाकरी हौसेनें करावी, ही केवढी शरमेची गोष्ट आहे ! ! शिरावर छत्र धारण करणें हा सार्वभौम दिल्लीश्वराचा मात्र अधिकार आहे. असें असतां त्या दिल्लीश्वराच्या इमानी सरदाराची तूं बेइमान बायको, शहाजी भोंसल्याच्या—त्या कवडीमोल कुणबटाच्या—बायकोवर छत्र धरतेस ! दे दे तें फेकून ! नाहीं तर पायाखालीं तुडवून मोडून टाकीन, आणि त्याच्या दांडीनें तुझी पाठ सडकून फोडीन ! ( एक यवनी म्हाळसाबाईचे हातांतून छत्र काढून घेते. ) तुम्ही शेफारलेल्या स्वछंदी बायका मोकळ्या सोडल्या तर डोक्यावर बसायच्या तुम्ही ! जनानखान्यांत निर्भयपणानें असलीं बेवकूबपणाची कर्मे करतां आणि उलट आम्हांवरच घसरतां ? गुन्हेगार तर गुन्हेगार, आणि शिवाय शिरजोर !

**म्हाळसाः**—( डोळ्यांत आंसवें आणून ) एवढा गहजब करण्याजोगा असा मीं गुन्हा तरी काय केला आहे ? जिजाऊच्या हौसेकरतां घटकाभर कांहीं एक खेळ केला एवढेंच ना ?

**जाधव०:**—जिजाऊच्या हौसेकरितां घटकाभर खेळ केला म्हणे खेळ ! असले हे दौलतीला आग लावण्याचे खेळ ! जहागीर गमावण्याचे खेळ ! बंदीखान्यांत

जाऊन पडण्याचे हे खेळ खेळावयाला तुम्हांला पाहिजेत! शतमूर्खे, सर्वभौम दिल्लीपतीचा तूं केवढा घोर अन्याय केला आहेस हें तुझें तुला तरी कळलें आहे काय? जिजाऊची हौस! असल्या हौसेमुळें तूं प्राणच गमावायचीस! पण तूं माझी स्त्री आहेस म्हणून एक वेळ सबुरी करतों. याउपर या राजद्रोही पोरीची कड घेऊन जर तूं अक्षर बोललीस तर तुला अद्दल घडवल्याखेरीज सोडणार नाहीं. ( जिजाऊस ) कायग कार्टे! तुझा नवरा दौलताबादेच्या तक्तावर बसूं लागला आणि त्याहीवर ताण करण्याकरितां तूं माझ्याच घरांत माझ्याच बायकोकडून डोक्यावर छत्र धरवतेस? इतका उन्माद तुझ्या अंगांत संचरला होता तर माझ्या घरीं येण्याचें तुला काय कारण होतें? बोल. कां माझ्या घरीं आलीस?

( जिजाऊच्या अंगावर धांवतो तों म्हाळसाबाई मध्यें येते. तो तिला ढकलतो. )

**जिजाऊः**—नका हो बाबा! नका तिला ढकलूं!

**जाधव०ः**—( म्हाळसाबाईस ) आलीस का मध्यें? या बंडखोर भोंसलीची तरफदारी करायला तुला पाहिजे नव्हे का? तूं भोंसल्यांना सामील झाली आहेस. तुला अशीच शिक्षा केली पाहिजे.

**म्हाळसाः**—करा! मला वाटेल ती शिक्षा करा! पण माझ्या जिजीला नका, नका दुःख देऊं!

**जाधव०ः**—( जिजाऊकडे वळून ) जिजी भोंसली! भोंसल्याच्या जिजी! माझ्या घरांत तुझें एवढें स्तोम पाहिजे कशाला? ( तिला फरफरा ओढतो. ) काय म्हणे ओंटी भरण्याचा समारंभ केला! ओंटी भरताहेत ओंटी! ( जिजाऊची ओंटी उधळतो. )

**म्हाळसाः**—( कपाळावर हात मारून ) अहो घात केलात हो घात केलात! भरल्या घरांत सुवासिनीची ओंटी—आणि त्यांतून तुमच्याच गर्भार मुलीची ओंटी—ऊधळलीत! हे काय हो अवलक्षण तुम्हांला सुचलें? ऐश्वर्याचा, लौकिकाचा किंबहुना प्राणाचाही घात करून घेण्याची ही दुर्वासना तुम्हांला कां उद्भवली? ( हुंदका आंवरून ) अहो महाराज, या ओटीचा कण कण उधळलात यांत तुमचा आयुष्याचा क्षण क्षण तुम्ही आपल्या हातानें उधळून दिलात! हे कण—हे तुमच्या आयुष्याचे क्षण—प्रयत्नानें गोळा करून पुन्हां तिच्या ओटींत घालूं या. ( ओंटी पुन्हा भरूं लागते. )

**जाधव०**:--पोरांना भेडसावण्याच्या या गोष्टी कशाला सांगतेस मला? (पुन्हां ओटी उधळतो. )

**म्हाळसा**:—आजपासून या घराकडे लक्ष्मीनें पाठ फिरवली! सौख्य, किर्ती, जय, वर्चस्व, या घराची सर्व शोभा समाप्त होण्याची आजपासून सुरवात झाली! ( ओक्साबोक्सी रडते. )

**जिजाऊ**:—आई, तूं कां श्रमी होतेस? माहेरघराला माझी ही शेवटची भेट आहे. पुन्हां नाहीं बरें तुला माझ्याबद्दल कष्ट होणार! बाबा, मला इकडे येण्याकरितां तुम्हीं निरोप पाठवलात त्या वेळची तुमची प्रेमबुद्धि आतां कोणत्या तरी निमित्ताने पालटली आहे. तुम्हांला शांत करण्यासाठीं मीं कोणताही यत्न केला तरी तो निष्फळच होणार असें तुमच्या क्रोधाच्या आवेशावरून दिसतें. तुम्ही मला जन्म दिला, त्याअर्थी कसेही वागलांत तरी मला सर्वदा वंद्यच आहां. मी नजरेसमोर असल्यानें तुम्हांला दुःख होत असेल तर मी इथे कशाला राहूं? दृष्टीआड झालें म्हणजे तरी तुमच्या मनाची पीडा दूर होवो! ( यवनींस ) हां, बहिनो! चलो, आपने मकान चलो! यहां रहनेसे कुच हांसील न होता.

**यवनी**:—हाम् हाजीर है!

**म्हाळसा**:—म्हटलें मनाची हौस फिटेल, सुख सोहाळे होतील, आठ पंधरा दिवस आनंदानें राहशील, पण नाहीं ते देवाला आवडत; तर काय करायचें बाई! म्हणताततना, मायेचें माहेर आणि न्यायाचें सासर. तुला येऊन चार दिवस झाले नाहींत तोंच प्रत्यक्ष तुझे वडीलच जर असा दुस्मानाप्रमाणें तुझा छळ करूं लागले, तर मी तरी तुझा कितीसा सांभाळ करणार! यापेक्षां तूं आपल्या घरीं जावेंस हेंच उत्तम! तुझें या खेपेचें बाळंतपण करायचें मीं ठरवलें आहे. पण तें आतां मला तुझ्याच घरीं येऊन केलें पाहिजे. इथे होण्याचें याउपर नांवच काढायला नको!

**जाधव०**:--( स्वगत ) कांहीं नको तिच्या घरीं जायला! आपल्या घरीं बसूनच तूं तिचें बाळंतपण करावेंस अशीच तजवीज करतों. घे हौस पुरवून!

**जिजाऊ**:-- बाबा, आई, येतें आतां! ( नमस्कार करिते. )

**म्हाळसा**:--येतेस? ये बरें बाळ! (तिला उराशीं धरते. स्मरण झाल्यासारखें करून ) पण थांब जिजी! तुला कुरवंडी करायची राहिली आहे ती करतें आणि मग जा. बरेंना? ( इकडे तिकडे शोधीत ) इथे कुरवंडीचें सामान नाहीं कुठे दिसत? थांब जिजी, आलेंच मी आंतून कुरवंडीचें सामान घेऊन. ( जाते. )

**जाधव०:**—( उपहासानें स्वगत ) या सावकाश या बरें! बरी पीडा गेली इथून! ( उघड ) जिजी! तूं सासरीं जाऊं नकोस.

**जिजाऊ:**—( खिन्नपणानें ) इथे राहण्यांत आतां काय गोडी राहिली आहे? मी जावें हेंच बरें!

**जाधव०:**—पण मी तुला जाऊं देणार नाहीं. जगदेव! ( जगदेवराव येतो. )

**जिजाऊ:**—तुम्ही मला कां नाहीं जाऊं देणार म्हणतां?

**जाधव०:**—तूं मोंगल बादशहाची गुन्हेगार आहेस. आणि त्या बादशहांचा दक्षिणेंतला मुख्य सरदार मी महाराजा लुखजी जाधवराव तुझ्या गुन्ह्याबद्दल तुला कैद करीत आहें. जगदेव! जिजीबरोबर कोण स्वार शिपाई आले आहेत त्यांचीं घोडीं हत्यारें हिसकून घेऊन त्यांना हांकलून लाव!

**जगदेव०:**—ठीक आहे. जाऊ देत भोंसल्याकडे कोकलत!

**जाधव०:**—आणि जगदेव, कोठावळयाला म्हणावें या मुसलमानणी तुझ्या वहीला जमा करून घे. हरभरे भरडायला उपयोगीं पडतील!

**जगदेव:**—भल्या रांडा धिप्पाड दिसताहेत!

**जिजाऊ:**—पण बाबा, तुम्हीं मला ओंटभरणाच्या निमित्तानें बोलावून आणलेंत आणि आतां कैद करतों म्हणतां, हा विश्वासघात नव्हे का?

**जाधव०:**—ओंटभरण! इथे कोण तुझ्या ओंटभरणाचें कौतुक करायला बसला आहे! तें ओंटभरणाचें नुसतें निमित्त होतें. दौलताबादेस तुझा नवरा मला दगा करील म्हणून आगाऊ तुला आणून इथे ओलीस ठेऊन घेतलें होते. जांवयाजवळ मुलगी जामीन मागणें वाईट दिसतें, म्हणून ओंटभरणाचें निमित्त केलें. समजलीस?

**जिजाऊ:**—बरें. तुमचें निमित्त आतां भागलें आहे. आतां मला कां जाऊं देत नाहीं?

**जाधव०:**—बादशाही राज्यांत बादशहांखेरीज कोणाही माणसानें डोक्यावर छत्र घेणें हा गुन्हा आहे. हा गुन्हा तूं केलास, सबब तुला अटकेंत ठेवलें पाहिजे.

**जिजाऊ:**—जेथपर्यंत माझ्या उदरांत छत्रपतीचा वास आहे, तेथपर्यंत छत्रचामरादि राजचिन्हें धारण करण्याचा मला अधिकार आहे. हें माझें ऐश्वर्य मला

ईश्वरानें दिलें आहे. माणसानें दिलेलें नाहीं. आणि तें कोणाही माणसाला कदापि हिसकून घेतां येणार नाहीं. तथापि बादशाही राज्यांत हीं राजचिन्हें धारण केलीं तर तो अन्याय होतो असें आपणाला वाटत असेल तर बादशाही राज्याबाहेर माझ्या हद्दींत मला जाऊं द्या म्हणजे झालें.

**जाधव०**:—नाहीं. नाहीं. तुला इथे अटकेंतच राहिलें पाहिजे.

**जिजाऊ**:—बाबा, ओंटभरणाचें निमित्त करून तुम्हीं मला जामीनगतीसाठीं बोलावून आणलेंत, त्याचप्रमाणें हें छत्रधारणाचें निमित्त करून मला आतां अटकेंत ठेऊं पहात आहां. मला असा प्रतिबंध करण्यांत तुमचा हेतु काय हेंही तुम्ही ज्याअर्थीं सांगत नाहीं त्याअर्थीं तो हेतु माझ्या बरेपणाचा नसावा असें मी अनुमान करतें. बाबा, तुम्हीं धर्मज्ञ, धर्मात्मे आहांत. तुमच्या कृत्याला बरें वाईट म्हणण्याचा मला अधिकार नाही. पण तुम्हीच मनाशीं विचार करा कीं, प्रत्यक्ष आपल्या कन्येशीं असा विश्वासघात करणें हें तुमच्या लौकिकाला शोभण्याजोगें आहे काय ?

**जाधव०**:—पण तूं माझी कन्याच नव्हेस ! मलिकंबरानें माझ्या मानेवर तरवार ठेऊन जरबदस्तीनें माझ्याकडून तुझा हात मालोजी भोंसल्याच्या पोराच्या हातांत ज्या दिवशीं देववला त्या दिवसापासून तूं मला नकोशी झाली आहेस. त्यांतून मी तुझ्या मुलाला मोंगलाई सरकारची सरदारी देववण्याचा विचार योजला होता, त्याला जर तूं मान्यता दिली असतीस, तर माझी कृपा तुझ्यावर असती. पण तसें करणें तुला आवडलें नाहीं !

**जगदेव**:—भद्र्या कपाळाची कारटी !

**जाधव०**:—मी तुझा बाप तुझ्याच हिताची गोष्ट सांगत असतां माझी इच्छा तुच्छ मानलीस आणि माझ्या वैऱ्याला–त्या शहाजी भोंसल्याला–अनुसरलीस !

**जिजाऊ**:—ज्यांना तुम्हीं मला दिलेंत त्यांना अनुसरलें बाबा !

**जाधव०**:—आणि म्हणूनच मीं या घराशीं तुझा संबंध तोडून टाकला. जाधवरावांशीं तुझें आतां कांहीं एक नातें राहिलें नाहीं. जिजी नांवाची मला एक मुलगी होती ती मरून गेली असेंच मी समजतों. तूं भोंसली आहेस, आणि म्हणूनच माझी वैरीण आहेस. मुलगी नव्हेस.

**जिजाऊः**—लेंकराचें नातें तुटलें म्हटल्यानें तें आईबापांना तुटत नसते. तथापि मी तुमची वैरीण आहें असेंच क्षणभर समजूं. विचार करा कीं, माझी स्थिति काय आणि तुमचा लौकिक काय? तुम्ही वीरश्रेष्ठ आहांत. धर्मवीर, दानवीर आणि युद्धवीर अशा तीन प्रकारांनीं वीरमंडळांत तुमची श्रेष्ठपणाची पायरी आहे. अशा वीरांनीं मजसारख्या अडचणींत सांपडलेल्या एकाकी अबलेवर वैर उगवून घ्यावें यांत काय भूषण आहे? तुम्हांशीं बरोबरीनें लढणारे तुमचे प्रतिस्पर्धी दौलताबादेस आहेत ते लढाईसाठीं तुमची वाट पहाताहेत. तुम्हींही त्यांवर मोहीम करण्याची तयारी केलीच आहे. घोडा मैदान जवळच आहे. जर अंगांत पराक्रम असेल तर तो तुमच्या बरोबरीचे शत्रु आहेत त्यांना दाखवा. माझा छळ करून तुम्हांला काय फायदा?

**जाधव०:**—जिजी, पराक्रम दाखवायची गोष्ट बोलतेस तर तुला खात्री असूं दे कीं, आम्ही आठ पंधरा दिवसांतच दौलताबादेवर चालून जाऊं आणि लढाई मारून सुलतानाला आणि तुझ्या नवऱ्याला कैद करून आणूंच आणूं त्यांत काय संशय आहे?

**जिजाऊः**—झालें तर! एवढी हिंमत अंगांत असल्यावर या वल्गना खऱ्या करून दाखवण्याचा योग्य मार्ग सोडून तुम्ही मला अटकाव करावा यांत हेतु काय?

**जाधव०:**—जिजी, बाळंत होईपर्यंत तुला माझ्या कैदेंत राहिले पाहिजे. तुझ्या उदरीं नवीन छत्रपति जन्मास येणार असा मुलखांत बोभाटा झाला आहे; ते तुझें पोर ठेऊन घेऊन मी तुला तुझ्या घरीं पाठवून देईन. तेथपर्यंत तुझी सुटका इथून व्हायची नाहीं.

**जिजाऊः**—एकूण तुमचा सर्व राग काय तो माझ्या बाळावर आहे, आणि ते बाळ अजून जन्मालासुद्धां आलें नाहीं तोंच तुम्हांला थरकांप सुटला आहे!

**जाधव०:**—थरकांप सुटला आहे? थरकांप सुटला असता, पण तूं आयतीच माझ्या हातांत सांपडलीस त्यामुळें मी निर्भय आहे. आतां कशाचें भय! माझा मुलगा छत्रपति होईल आणि त्यापुढें मी जाधवरावांची मान वांकवीन तरच नांवाचा शहाजी भोंसला, अशी तुझ्या नवऱ्यानें प्रतिज्ञा केली आहे ती खोटी पाडण्याचा विचार नको—जाधवरावांना पहायला? पहा बुवा, जगदेव, घराण्याचा दरारा आणि भोंसल्यांचा दावा पुढें चालवण्याचें जोखीम माझ्याप्रमाणें तुझ्याही शिरावर आहेच. ही वेळ कशी संभाळायची हें तुझें तूं पाहून घे!

**जगदेवः**—दादा, त्याची काळजीच नको करायला ! जिजीचें पोर उपजल्या-बरोबर नाहींसें करतों आणि पृथ्वींत जेवढे म्हणून भोंसले असतील तेवढे धुंडाळून काढून त्यांचीं खांडोळी करून टाकतों !

**जाधव०**:—ठीक. ठीक. असेंच आतां करायला पाहिजे. हे भोंसले फार मातले आहेत ! जगदेव, जिजीला तळघरांतल्या खोलींत कोंडून ठेवायचें आहे. तिथे सक्त पहारा राहूं दे; आणि पहारेवाल्यांना ताकीद दे कीं, खोलीच्या आसपास कोणीहि माणूस फिरकेल तर त्याला बेलाशक तोडून टाका !

**जिजाऊः**—बाबा, असा अन्याय करूं नका ! मला जाऊं द्या. हें मागणें मी माझ्यासाठीं मागत नाहीं. तुम्ही मला टाकलेंत तरी मीं तुम्हांला टाकलें नाहीं ! मी भोंसली असलें तरी जाधवरावांच्या घराचा अभिमान मला पूर्ण आहे. त्या घरचा उत्तमोत्तम लौकिक तुम्हीं खोट्या अभिमानाच्या आणि खोट्या स्वाभिमानाच्या पायीं गमावूं नये ही मी तुम्हांला प्रार्थना करतें.

**जाधव०**:—नाहीं. नाहीं. तुला माझ्या कैदेंतच राहिलें पाहिजे.

**जिजाऊः**—मी कुणाच्याही कैदेंत राहणार नाहीं.

**जाधव०**:—कशी रहात नाहीस ती पहातों आतां ! मी स्वतःच तुला ओढीत नेऊन तळघरांत कोंडतों.

**जिजाऊः**—तुम्हांला मी निराधार सांपडलें या समजुतीनें तुम्हीं माझा छळ करावा म्हणतां; पण मी इथेसुद्धां निराधार नाहीं, हें समजून काय करायचें ते करा म्हणजे झालें.

**जाधव०**:—इथे तुला कोण सोडवणारें आहे ?

**जिजाऊः**—माझी माउली जगदंबा !

**जगदेवः**—ती राहिली तुळजापुरांत !

**जिजाऊः**—काय ही भ्रांत ! जगदंबा सर्वत्र आहे व तुमचें चरित्र पहात आहे. तुम्ही तिचा अंतच पाहूं लागलां तर ( यवनींकडे बोट दाखवून ) या बायांना-सुद्धां मला सोडवण्याचें ती सामर्थ्य देईल !

**जाधव०**:—( हंसत ) जिजी, तूं शरीरानें आणि वयानें मोठी झालीस पण तुझी बालबुद्धि अजून गेली नाहीं ! आम्हांपुढें या अबला काय करणार ?

**जिजाऊः**—ज्या आदिशक्तीनें मर्कटांकडून रावणाची लंका उध्वस्त करवली, तिला या अबलांना प्रबळ करणें काय अशक्य आहे ?

**जाधव०**:—चल आतां! बडबड करूं नकोस, जगदेव, धर हिला आणि घाल तळघरांत कोंडून! ( जगदेवराव जिजाऊचा हात धरून तिला ओढूं लागतो तो यवनींचे वेष टाकून रायबा व त्याचे सोबती प्रकट होतात. रायबा जगदेवरावास पाडून त्याच्या छातीवर बसतो. दुसरे दोन सोबती जाधवरावाच्या छातीवर कट्यारी रोंखितात. )

**रायबा**:—गड्यांनो लुक्या जर गडबड करूं लागला तर त्याला ठार मारून टाका! कायरे जगद्या! मांग्या! भोंसल्यांची खांडोळी कशी काय करतोस ते पहायला आम्ही पांच भोंसले इथे तुझ्या उरावर उभे आहों. छत्रपतीला नाहींसा करीन म्हणतोस नव्हे का? तुलाच नाहींसा करतों आधीं! घे देवाचे नांव! ( कट्यार काढून जगदेवरावाच्या छातींत भोसकण्याचा अविर्भाव करतो. )

**जिजाऊ**:—( रायबाचा हात धरते. ) रायबा, रायबा, काकांना मारूं नकोस क्षमा कर.

**रायबा**:—बाईसाहेब, हे स्वराज्याचे द्वेष्टे! हे दुस्मानांचे बंदे! हे तुरुकड्यांचे कुत्ते! यांची काय म्हणून गय करावी? नाहीं मी तुमचें ऐकत!

**जिजाऊ**:—रायबा, सोड, सोड काकांना! तुझ्या पायां पडूं का?

**रायबा**:—सोडूं? तुम्हीं इतक्या काकुळतीनें सांगतां तर सोडीन. पण एका शर्तीवर सोडीन.

**जिजाऊ**:—सांग कोणती शर्त ती?

**रायबा**:—पुन्हां तुम्हांला धरण्याच्या या पाजीपणाच्या धंद्यात पडणार नाहीं अशी लुक्यानें आपल्या सप्तपूर्वजांचें स्मरण करून शपथ घ्यावी.

**जिजाऊ**:—( जाधवरावाकडे वळून हात जोडून ) बाबा! वेळ आणीबाणीची आहे. हे अर्बुज लोक ऐकायचे नाहींत. परिणाम भयंकर होईल. घ्या शपथ!

**जगदेव**:—दादासाहेब! दया करा. माझे प्राण वांचवा.

**जाधव०**:—( उसासा टाकून ) जिजी! मी तुला धरण्याच्या उद्योगांत पुन्हां पडणार नाहीं ही सप्तपूर्वजांचें स्मरण करून मी शपथ घेतों.

**रायबा**:—म्हण, जर शपथेप्रमाणें न वागलों, तर मी जाधवरावांच्या वंशांतला नव्हे.

**जाधव०:**—जर शपथेप्रमाणें न वागलों तर मी जाधवरावांच्या वंशांतला नव्हे.

**रायबा:**—ऊठ जगद्या ! आजचा दिवस तुझें मरण चुकलें आहे. ( रायबा व जगदेवराव उठून उभे राहतात. ) बाईसाहेब, चला आतां ! इथे क्षणभर देखील रहायचें नाहीं. जाऊं या आपल्या घराला. नाहीं पण ! इथून जातांना लुक्यानें दगा केला तर ? तें कांहीं नाहीं. या जगद्याला जामीन म्हणून आम्हांबरोबर कैद करून नेलें पाहिजे. ( जगदेवरावास गचांडी देऊन. ) चल जगद्या आम्हांबरोबर ! जर कुठे यत्किंचित् वेडेंवांकडें आम्हांला दिसून आलें तर आधीं तुझा प्राण घेऊं. मग पुढला विचार ! आमच्या हद्दींत गेल्यावर तुला सोडून देऊं. चल. धर बाई-साहेबांच्या डोक्यावर छत्र !

**जगदेव:**—( ताठ्यानें ) नाहीं धरणार.

**रायबा:**—नाहीं धरणार तर फुकट मरणार !

**जगदेव:**—( जाधवरावाकडे वळून ) दादासाहेब ! काय आज्ञा ?

**रायबा:**—मस्तवाल बोकडा ! त्या थेरड्याला काय विचारतोस ? मुंडी काटली जाईल तुझी ! त्याला काय विचारतोस ?

**जाधव०:**—( जळफळत ) कर. कर. जगदेव, तो सांगतो तसेंच कर ! निवूं देत त्या दुष्टांचे डोळे !

( जगदेवराव जिजाऊच्या शिरावर छत्र धरितो. जिजाऊ जाऊं लागते तों दुसरी-कडून म्हाळसाबाई कुरवंडी घेऊन येते, व जगदेवरावाच्या हातांत छत्र पाहून व रायबा वगैरे लोकांस पाहून चकित होते. जाधवराव पाय आपटीत चरफडतो. पडदा पडतो. )

**( अंक दुसरा समाप्त. )**

---

# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला.

**स्थळः**—सिंदखेड. छावणी.

( इसामिय्या येतो. )

**इसा०:**—काय करावें! या मोहिमेला कोणती वाईट वेळ लागली आहे हें कांहीं समजत नाहीं! जें जें मसलतीचें घोडें पुढें पुढें दामटावें तें तें मागें मागें सरून आम्हांवरच दुगाण्या झाडतें आहे! दौलताबादेला वेढा घालावा, आणि सुलतानाला व शहाजी भोंसल्याला धरावें म्हणून फौजा तयार केल्या, आणि आतां आज उद्यां निघणार, तों बातमी येते कीं ते दोघेही दौलताबाद सोडून नाशाकाकडे पळून गेले. तिकडे त्यांच्या पाठीवर जावें तों तेथून ते दुसरीकडे जाणार, आणि तेथून तिसरीकडे जाणार, असें हें चालायचें तरी किती दिवस? जिजाऊला अटकेंत ठेवायचें जरी साधलें असतें तरी या मरगट्ट्यांच्या रंगड्या निम्या कमी झाल्या असत्या. पण आमच्या कमनशीबामुळें तेंही घडून आलें नाहीं. या मोहिमेंत आम्हांला जाधवराव सोबती मिळाला आहे याला अजागळ म्हणावें कीं लुच्चा म्हणावें हें कांहींच कळत नाहीं! एवढ्या प्रयत्नानें जिजाऊला मीं याच्या ताब्यांत आणून दिलें, तिला कैदेंत ठेवण्याचें याच्याकडून कबूल करवलें, आणि शेवटीं याच्या हातावर तुरी देऊन ती निसटून जायची ती गेलीच! अथवा यांत तिच्या शिताफीचें वर्णन तें काय करायचें? ही सारी याचीच लुच्चेगिरी नसेलसें कशावरून? म्हणे जाधवरावासारखा खंदा सरदार चार शिपुर्ड्यांच्या धमकावणीला भिऊन जिजाऊला खुशाल जाऊं देतो! ही असली बात एखाद्या पोराला सुद्धां खरी वाटणार नाहीं! तें कांहीं नाहीं, हा जाधवराव आणि याचा जांवई आंतून एक असले पाहिजेत असा मला बळकट संशय येतो. मला जिकडे तिकडे आतां संशय दिसूं लागला आहे. शहाजी दौलताबाद सोडून पळाला तो या जाधवरावाच्याच इशाऱ्यावरून पळाला नसेलना?

( जाधवराव येतो. )

**जाधव०:**—मिय्यासाहेब, मला वाटतें, मी घर सोडलें त्याला कांहीं चांगलासा मुहूर्त नाहीं लागला! हें पहा, मी निघालों त्या दिवशीं पालखींत बसून छावणीकडे

येतांना वाटेंत पालखीची दांडी मोडली हा पहिला अपशकुन झाला. दुसरे दिवशीं निशाणाचा हत्ती अकस्मात् आजारी पडून मेला हा दुसरा अपशकुन ! आणि काल रात्रीं डेऱ्यांत घुबड शिरलें होतें हा तिसरा अपशकून सर्वांत मोठा ! आम्ही ज्या मोहिमेवर निघालों आहों तींत आम्हांला खात्रीनें अपेश येणार असेंच हीं दुष्ट लक्षणें सुचवताहेत. तेव्हां म्हणतों, घरीं परत जावें आणि पुन्हां चांगला मुहूर्त पाहून निघावें !

**इसा०:**—( स्वगत ) जांवईबुवांना पळून जायला फुरसत सांपडावी म्हणून तर हा निघायची चुकवाचुकव करीत नसेलना ? ( उघड ) छेः छेः, राजेसाहेब, आतां कसला मुहूर्त घेऊन बसलांत नी कसचें काय ! वेळ अशी आणीबाणीची आली आहे कीं, या क्षणीं कुचाचा नगारा करून दौड मारून शत्रूच्या मागोमाग गेलें पाहिजे.

**जाधव०:**—( आश्चर्यानें ) मागोमाग गेलें पाहिजे ! मागोमाग कुणीकडे जायचें ? सुलतान आणि शहाजी तर दौलताबादेंत आहेत आणि तिकडे जायला आम्ही निघालोंच आहों. आणि दुसरा कोणचा शत्रू नवीन उत्पन्न केलात तुम्ही ?

**इसा०:**—( स्वगत ) एकूण मीं याचा संशय घेतला तो फुकटच ! याला अजून कांहींच बातमी कळलेली नाहीं. ( उघड ) अहो, तुम्ही सांगतां ती जुनी बातमी ! तिला घेऊन काय करतां ? माझे जासूद आत्तांच तिकडून आले त्यांच्या सांगण्यांतली बातमी फारच आश्चर्यकारक आहे. शहाजीनें आम्हांला चांगलेंच चकवलें ! राजेसाहेब, लढाईची मसलत नासली, रेंगाळली, सारा चुथडा होऊन गेला. आतां किती वर्षें लढाई लांबते नी काय होतें कुणाला ठाऊक ?

**जाधव०:**—आं ! तुम्हीं इतके उदास व्हावें अशी ती बातमी आहे तरी काय ?

**इसा०:**—बातमी अशी आहे कीं, सुलतान व शहाजी भोंसला दौलताबाद सोडून पळून गेले.

**जाधव०:**—( चपापून ) पळून गेले ? बरोबर कांहीं फौजफांटा घेऊन गेले कीं सड्या स्वारानेंच गेले ?

**इसा०:**—त्यांनीं नाशकाकडे जाण्याची हूल दाखवली आहे, पण मला वाटतें, शेवटीं तळकोंकणांत उतरून अवघड जंगली मुलखांत लढाई पाडावी आणि छापे घालून आम्हांला हैराण करावें असा त्यांचा इरादा दिसतो.

**जाधव०:**—तुमचा कयास बरोबर आहे. ते तळकोंकणांत गेले तर माहुलीच्या किल्ल्याचाच आसरा त्यांना धरावा लागेल.

**इसा०:**—कशावरून ?

**जाधव०:**—निजामशाही राज्याच्या त्या भागांत माहुलीखेरीज लढवण्याजोगा दुसरा किल्लाच नाहीं. बरें, त्यांच्या फौजेचा अजमास कांहीं समजला आहे काय ?

**इसा०:**—शहाजीबरोबर मराठी फौज म्हणाल तर दोन तीन हजारांचा सुमार आहे.

**जाधव०:**—ठीकच आहे. शहाजीनें बोलावलेली थोरली मराठी फौज शिरवळ, सातारा, वांई या मुलखांत गोळा होते आहे अशी बातमी आली आहे. ती फौज लढाईच्या तयारीला यायला महिना दोन महिने तरी पाहिजेत. तेथपर्यंत शहाजीला असेंच कोठें तरी आम्हांला झुकांड्या देत जंगलांतून भटकलेंच पाहिजे !

**इसा०:**—सुलतानानें मात्र निजामशाही फौज स्वारींत बरोबर घेतली आहे.

**जाधव०:**—म्हणजे स्वतःला गाडून घेण्यासाठीं त्यानें हा खळगाच तयार करून ठेवला म्हणायचा ! कारण ती फौज नांवाला मात्र सुलतानाच्या नोकरींत आहे, परंतु आंतून आम्हांला पक्की अनुकूल आहे हें तुम्हांला ठाऊकच आहे. आयत्या वेळीं आम्हांकडून सूचना जाण्याचा अवकाश, कीं ती आम्हांला येऊन मिळणार आणि सुलतानाला त्याच्या वजिरासकट पकडून आमच्या हवालीं करणार ! मिय्यासाहेब, लढाईचें क्षेत्र बदललें म्हणून मोहिमेची मसलत बिघडली असें तुम्हांला वाटत असेल, पण मला तसें बिलकुल वाटत नाहीं. उद्यां अरुणोदयाबरोबर कुचाचा नगारा करून निघूं आणि शत्रूचा झपाट्यानें पाठलाग करूं म्हणजे झालें ! तो जाणार कुणीकडे ?

**कमालखानः**—(एकदम प्रवेश करून) मिय्यासाहेब, कशाला तुम्ही आणि राजेसाहेब स्वारीला निघण्याची तसदी घेतां ? मोंगलाई मराठी फौजेचा सर्व अखत्यार माझ्यावर सोंपवा आणि मग पहा माझ्या बहादूरीचा चमत्कार ! शहाजीशीं लढाई मारून त्याची शरणचिठ्ठी तुम्हांला आणून देतों. अथवा इतकें कशाला, त्यालाच मुसक्या आवळून तुम्हांपुढें हजर करतों ! शहाजी भोंसल्याची काय एवढी बिशाद लागली आहे ?

**जाधव०**:--चल बैला ! तुझा वात्रटपणा ऐकत बसणें या वेळीं आम्हांला रुचत नाहीं. चालता हो.

**कमाल०**:--अस्सें ! अस्सें ! तुमचा मतलब आला माझ्या ध्यानांत ! तुम्ही दोघेही नामांकित बडे सरदार, तेव्हां शहाजी भोंसल्याचा पराजय आम्हीं केला म्हणून बादशहांपुढें प्रौढी मिरवायला पाहिजे ना ! शहाजीला जिंकण्याचें यश तुम्ही कुठचे माझ्या वांट्याला येऊं द्यायला ! बरें बुवा ! घ्या तुमचा शहाजी तुम्हांला ! त्याचा नाद तूर्त मी सोडून देतों. तुम्ही थकलांत तर शेवटीं मी आहेंच ! काळजी करूं नका. आतां या कमालखानजींच्या मर्दुमीला साजेल अशी दुसरी मसलत म्हटली तर छत्रपति उपजल्याबरोबर त्याला धरून आणण्याची एवढी एक दिसते आहे. राजेसाहेब, तेवढी तरी बहादुरी माझ्या हातून होऊं द्या !

**जाधव०**:—तुला कुणीं नको म्हटलें आहे ?

**कमाल०**:—नको म्हणायचें नाहीं आणि वेळ आली म्हणजे करूं द्यायचें नाहीं अशांतला तुमचा प्रकार आहे. मिय्यासाहेब, छत्रपतीपर्यंत या कमालखानाचा हात पोचावा अशी जर राजेसाहेबांची इच्छा असेल तर मला तसें करूं देणें ह्यांच्या हातांतलें आहे.

**इसा०**:—( उत्सुकतेनें ) तें कसें काय रे ?

**जाधव०**:—मूर्ख बेटा ! तोंडाला येईल तें बडबडत सुटला आहे.

**कमाल०**:--( जाधवरावाकडे पाहून डोळे मिचकावीत ) तें कसें काय तें राजेसाहेबांना सर्व माहित आहे.

**जाधव०**:—मला काय माहीत असणार तूं काय म्हणतोस तें ? तोंड आटप. नाहीं तर मार खाशील.

**इसा०**:--बोलूं द्या, बोलूं द्या ! मला त्याच्या बोलण्याची मौज वाटते आहे.

**कमाल०**:--मिय्यासाहेब, गोष्ट फार गुप्त ठेवायची आहे. कुणाजवळ बोलायची नाहीं म्हणून तुम्हांला सांगतों. आमच्या राणीसाहेब जिजाऊच्या बाळंतपणासाठीं भोंसल्याकडे जाणार आहेत तेव्हां राजेसाहेबांनीं मला बरोबर पाठवलें, तर नाहीं का छत्रपतीला पकडून आणण्याचें काम मी करून दाखवणार ?

**जाधव०**:—काय बडबडतो आहेस गाढवा ! ब-या बोलानें शुद्धीवर येतोस कीं थोबाडींत मारून उतरूं तुझी झिंगी ?

**इसा०:**—(स्वगत) शाबास! जीते रहो पठ्ठे! भलत्याच माणसाजवळ भलतेंच भकला नाहींस तर तूं गांजेकस कसला?

**कमाल०:**—हें हो काय! माझ्यावर उगीच कां रागावतां? मी पदरचें थोडेंच बोलतों आहें! राणीसाहेबांच्या कुळंबिणी बोलत असतात तें मीं ऐकलें आणि मिय्यासाहेबांजवळ गुप्त गोष्ट—कोणाजवळ सांगायची नव्हे—म्हणून बोललों! यांत माझा काय बरें अन्याय?

**जाधव०:**—(कमालखानाचा कान धरून) पण कोणी कांहीं बोललें तरी तुला इतकें कळायला पाहिजे होतें कीं, ज्या माणसाशीं आमची लढाई चालू आहे त्याच्या बायकोचें बाळंतपण करायला त्याच्या घरीं आमच्या राणीसाहेब जातील कशा? एवढें तुला कळत नाहीं तर तूं माणूस कसला? गद्धा आहेस तूं! (ठोंसा मारतो.) खबरदार हे शब्द पुनः बोललास तर!

**कमाल०:**—बरें. बरें. छत्रपतीला पकडूं नको म्हणतां तर राहूं द्या त्याला त्याच्या आईजवळ! माझ्या तावडींतून शहाजी सुटला आणि छत्रपति सुटला तरी राजेसाहेब, तुमचा तिसरा दुस्मान रायबा भोसला आहे त्याला तरी माझ्या वांट्याला राहूं द्याल कीं नाहीं? राजेसाहेब, त्या रायबानें दौलताबादेस माझ्या पाठीवर काठ्या मारलेल्या आहेत आणि माझी मिरवणूक काढलेली आहे. इथे तर त्यानें तुमच्या छातीला कट्यार लाऊन तुम्हांला हालूं कीं बोलूं दिलें नाहीं, आणि धाकट्या यजमानांना कैद करून नेलें! रायबा हा जसा तुमचा दुस्मान तसा माझाही दुस्मान आहे. तुम्ही व मी या बाबतींत समदुःखी आहों! रायबावर सूड उगवण्याचें तुमचें काम मी बजावून दाखवतों! त्या दुष्टाचें नांव निघालें कीं, माझ्या अंगाचा तिळपापड होत असतो तो काय सांगूं! कधीं एकदां त्या रायबाची हड्डी नरम करीन असें मला झालें आहे! जिजाऊ जाऊं लागली तेव्हांच मी त्या रायबावर तरवार उपसून हल्ला करणार तों तुम्हीं मला पकडून कोठडींत कोंडून घातलेंत; हा काय न्याय झाला?

**जाधव०:**—कोठडींत घालूं नको तर काय करूं? तरवार उपसायचें राहोच, पण गांजाच्या तारेंत तूं नुसता एक शब्द बोलतास, तरी सुद्धां माझा जगदेव मारला गेला असता. ती वेळच तशी भयंकर होती.

**कमाल०:**—पण रायबाला मारून मीं जिजाऊला परत आणलें असतें तर सरकारचें केवढें काम होऊन गेलें असतें! धाकटे यजमान मेलें असतें तर मेले

असते! त्यांत तरी मिय्यासाहेब, एवढें काय वाईट होत होतें हो ! हो, देवाचें काम काय आणि बादशहाचें काम काय, दोन्हीं एकच! धाकटे यजमान बादशहाच्या कामावर मेले असते तर बादशाही पीर झाले असते! आणि बादशाही खर्चानें त्यांचा छानदार दर्गा बांधला जाता! आणि मी बादशाही नोकर त्या पीराचा मुंजावर झालों असतों! आणि बादशहांकडून पिराच्या खर्चाकरितां हजारों रुपयांची नेमणूक मिळवली असती! आणि याच गांवांत गांजेकसांची जंगी मैफल करून जिकडे तिकडे असा धूरच धूर करून टाकला असता कीं लोकांनीं म्हणावें, ही काय राजधानी आहे कीं कुंभारवाडा आहे!

**जाधव०:**—( रागानें ) कायरे पाजी! माझेंच अन्न खातोस आणि माझ्या भावाला मरण आलें तरी बरेंच म्हणतोस! असा तूं निमकहराम! चालता हो इथून. पुनः मला तोंड दाखवलेंस तर तुलाच पीर बनवीन. याद राखून ठेव.

**कमाल०:**—राजेसाहेब, पीर होण्याजोगी पुण्याई माझ्या पदरीं कुठची येईल? मी मेलों तर पीर होण्याऐवजीं झोटिंग होऊन मिय्यासाहेबांसारख्यांच्या उरावर बसायचा!

**इसा०:**—तर मग मरूं नकोस, मरूं नकोस बाबा! तूं जिवंत असलेलाच बरा!

**कमाल०:**—बाकी तुम्ही तोंड दाखवूं नको म्हणतां तर हा मी निघालों! पण जातांना हजार गोष्टींतली गोष्ट तुम्हांला सांगतों ती ध्यानांत धरा. जिजाऊला पुनः धरून आणल्याखेरीज शहाजीची मस्ती उतरायची नाहीं आणि ही मोहीम संपायची नाहीं! तिला धरून आणायचें तर आधीं रायबाचें भूत जमिनींत गाडलें पाहिजे आणि त्याच कामावर हा पंचाक्षरी कमालखान निघाला आहे. तो रायबा भोंसला आभाळांत, पाताळांत, डोंगरांत, जंगलांत कुठेही दडून बसला तरी हा कमालखान त्याला मारून टाकील! त्याखेरीज हा पुन्हा तुम्हांला तोंड दाखवणार नाहीं. पहा! कमालखान निघाला! चालला! गेला! ( जातो. )

**जाधव०:**—जा. जा. आणि कुठे तरी मर शिंच्या एकदांचा! मिय्याजी, गांजेकस झाले तरी इतके बेताल भकत सुटतात काहो? माझें तर डोकें अगदीं भणाणून गेलें!

**इसा०:**—गांजेकसाचें बोलणें ना जमेंत ना खर्चांत. तें काय मनावर घ्यायचें? पण भरकटतां भरकटतां तो एक गोष्ट बोलून गेला ती मात्र अक्षरशः खरी असून

ती आम्हीं मनावर ठसवून घ्यायला पाहिजे आहे. जिजाऊला पुनः धरल्याखेरीज ही मोहीम संपायची नाहीं. हें वाक्य गांजेकसाच्या तोंडून निघालें असलें तरी त्यांत कारस्थानीची सर्व अक्कल सांठवलेली आहे, असें नाहीं तुम्हांला वाटत ?

**जाधव०**:—( उसासा टाकून ) होय बुवा, तुम्हांप्रमाणें मलाही त्याचें म्हणणें खरें वाटतें. पण नुसतें वाटून काय उपयोग ?

**इसा०**:—कां ? जिजाऊला धरण्याचा तुम्हीं पुनः उद्योग कां करीत नाहीं ?

**जाधव०**:—नाहीं. नाहीं. तें काम मला सांगूं नका. मी तें करणार नाहीं.

**इसा०**:—तुम्ही करणार नाहीं, तर दुसरा कोण करील ? तुम्ही तिचे वडील आहां. कांहीं तरी हुलकावणी दाखवून तिला कबजांत आणायचें काम कराल तर तुम्हीच कराल. हें मोंगल सरकारचें फार फार महत्वाचें काम करून दाखवायला तुम्हीं मागें सरणार नाहीं असा मला पूर्ण भरंवसा आहे.

**जाधव०**:—ते सारें खरें, पण मी लाचार आहें. मला या फंदांत पडतां येत नाहीं.

**इसा०**:—कां बरें ?

**जाधव०**:—जिजीला धरण्याच्या उद्योगांत मी पडणार नाहीं अशी मीं रायबा भोंसल्याला शपथ दिली आहे.

**इसा०**:—( आश्चर्यानें ) शपथ दिली आहे ! मला कळवल्याखेरीज शत्रूला अशी शपथ तुम्हीं कशी दिलीत ?

**जाधव०**:—असली शपथ कुणी हौसेनें थोडाच देत असतो ! त्यानें अडचणींत गांठून मला नडवले तेव्हांच ती शपथ देऊन मला सुटका करून घ्यावी लागली.

**इसा०**:—झालें तर ! शत्रूनें तुम्हांला अडचणींत धरून नडवून शपथ घेववली, ती काय पाळायची आहे ?

**जाधव०**:—नाहीं. नाहीं. शपथ ती शपथ ! त्यांतून ती पूर्वजांचें स्मरण करून घेतलेली शपथ. ती मोडून मीं पूर्वजांना अधोगतीला कसा घालवूं ? मिय्या-साहेब, ती शपथ मी मोडणार नाहीं.

**इसा०**:—नाहीं मोडणार ?

**जाधव०**:—कधीं मोडणार नाहीं.

**इसा०**—( स्वगत ) अजूनसुद्धां मुलीची ममता याला सुटत नाहीं हेंच खरें. आतां कांहीं धमकी दाखवून उपयोग होतोसा पाहूं. ( उघड ) राजेसाहेब शहाजीचा गिल्ला प्रथम तुम्हींच बादशहांना लिहून पाठवलात.

**जाधव०**:—बरें मग ?

**इसा०**:—तुम्ही बादशाही कृपेंतले नेकीचे थोर सरदार, सबब तुमचा अर्ज गेल्याबरोबर बादशहानीं फौजेसह आमची रवानगी दक्षिणेंत केली. त्यानीं इतका भरंवसा तुम्हांवर टाकल्यासारखें त्या भरंवशाचें चीज तुम्हीं करीत आहां असें मला वाटत नाहीं. सरकारची इमानानें चाकरी करणें आणि सरकारचा जो दुष्मन् तुमचा जांवई त्यांशीं स्नेह राखणें, या दोन्ही गोष्टी जमायच्या नाहींत. जाणून बुजून तुम्ही हें दुटप्पीपणाचें वर्तन करीत असल्याचा संशय जर बादशहांना आला तर तुम्हांला फार जड जाईल, हें मीं सांगायला पाहिजे असें नाहीं.

**जाधव०**:—( रागानें ) माझ्या वर्तनांत दुटप्पीपणा असल्याचा आरोप तुम्ही कोणत्या आधारावर करतां हो ? भोंसल्याशीं मी स्नेह राखल्याचा संशय तुम्हीं घेण्याला काय कारणें झालीं आहेत ?

**इसा०**:—कारणें पाहिजेत तुम्हांला ? ऐका तर मग ! शहाजी तुम्हांला भेटायला आला असतां तुम्हीं त्याला कैद केलें नाहीं हें पहिलें कारण. जिजाऊ तुमच्या हातांत सांपडली असतां तुम्ही तिला जाऊं दिलेंत हें दुसरें कारण; जिजाऊच्या बाळंतपणासाठीं भोंसल्यांच्या घरीं जाण्याचा तुमच्या कुटुंबाचा बेत आहे हें तिसरें कारण.

**जाधव०**:—( स्वगत ) आग लागो त्या गांजेकसाच्या फुटक्या तोंडाला !

**इसा०**:—आणि चवथें कारण, जिजाऊला धरण्याचा मीं यत्न करणार नाहीं अशी तुम्ही रायबा भोंसल्याला शपथ दिलीत ! इतकें करून सवरून भोंसल्याशीं माझें वैर आहे असें तुम्ही बोलतां, तर हें तुमचें बोलणें तुमच्या बडे-पणावर लक्ष देऊन लोकांनीं खरें मानायचें कीं काय ? जिजाऊला तुम्हीं पुन्हां धरून दिलेंत तर मात्र हा तुम्हांबद्दलचा संशय दूर होईल. नाहीं तर प्रसंग कठिण पडेल.

**जाधव०**:—ज्या ज्या गोष्टी माझी कसूर म्हणून तुम्ही पुढें करतां त्या सर्व केवळ सहजगत्या घडून आलेल्या आहेत. त्याबद्दलचा माझ्याकडे, कोणताच दोष नाहीं. इतकें असून सरकार जर माझ्या वर्तनाबद्दल उगाचच्या उगीच संशय घेईल

तर माझा निरुपाय आहे. पण मिय्यासाहेब, तुम्हांला साफ सांगतों कीं, सरकारचा संशय घालवण्याकरतांसुद्धां मी जिजीच्या बाबतींत घेतलेली शपथ मोडणार नाहीं.

**इसा०:**—( स्वगत ) डोचकें आपटा या दगडावर ! याला कांहीं द्रव यायचा नाहीं. ( उघड ) जिजाऊला धरल्याखेरीज ही मोहीम तडीला जाणें मुष्किलीचें आहे; आणि तुम्ही म्हणतां मी तिला धरणार नाहीं. मग तिला धरायचें कुणी ?

**जाधव०:**—तुम्ही धरा पाहिजे तर !

**इसा०:**—( स्वगत ) तुम्ही धरा आणि तोंडघशीं पडा असेंच म्हणेनास ? ( उघड ) आम्हीं धरायला गेलों आणि आयत्या वेळीं तुम्हीं हरकत केलीत तर ?

**जाधव०:**—मी हरकत करणार नाहीं.

**इसा०:**—आतां असें बोलतां आहां, पण हरकत करण्याबद्दल शत्रूने तुम्हां-पासून वचन घेतलें तर ?

**जाधव०:**—शत्रूला मी असलें वचन कसें देईन ?

**इसामिय्या:**—पण समजा वचन दिलेंत; तर पुढें काय वाट ?

**जाधव०:**—( रागानें ) समजा काय ? वचन देणार नाहीं असें मी म्हणतो आहें ना ?

**इसा०:**—खरें, पण शत्रूनें तुम्हांला अडचणींत गांठून तुम्हांपासून असें वचन घेतलें तर काय कराल ?

**जाधव०:**—लुखजी जाधवराव सत्यवक्ता आहे. त्याच्या तोंडून वचन गेलें म्हणजे प्राण गेला तरी तो तें मोडणार नाहीं !

**इसा०:**—आं ! तर मग महाराज, जिजाऊला तुम्ही धरूं लागल्यास मी हर-कत करणार नाहीं असें वचन तुम्हांकडून मला आगाऊच घेतलें पाहिजे ! तसें वचन तुम्ही देत नसाल तर मोहिमेची ही सारी दगदग पाहिजे कशाला ? मी फौज घेऊन परत निघून जातों !

**जाधव०:**—असे एकदम वर्दळीवर कसे येतां हो ? तुम्ही मागतां तें वचन दिलें म्हणजे झालेंना ? तुम्हांला वाटतें जिजीवर माझी माया असेल आणि मी शपथ ध्यायला मागें सरेन ! हें पहा काय तें ! अहो, तिला मीं धरून ठेवण्याचा घाट घातला असतां ती मला लाथा मारून कशी कशी निघून गेली हें आठवलें म्हणजे अंगाची होळी होते आहे होळी ! माझ्यासमोर तुम्हीं तिची मान कापलीत तरीसुद्धां माझ्या

डोळ्यांना पाणी यायचें नाहीं. आणखी काय सांगूं? तुम्ही मागतां तें वचन मी देतों. ती तुम्हांला सांपडेल तर तिला तुम्ही खुशाल धरा! आतां झालेंना?

**इसा०:**—( साशंक मुद्रेनें ) तुम्ही नुसतें वचन द्याल तर तें उपयोगाचें नाहीं. हातांत गीता व गंगाजळ घेऊन शपथ द्याल तरच माझी खात्री होईल.

**जाधव०:**—ठीक आहे. तसेंच करतों. ( इसामिय्या जातो. ) काय एकेक लचांड पहा! ही मोहीम कशी यशस्वी होईल म्हणून मी रात्रंदिवस धडपडतों आहें, हातचें पदरचें भरीला घालतों आहे, माझ्या जातिबांधवांचें वैर खुषीनें पत-करलें आहे, सोयऱ्यांच्या स्नेहाला मुकलों आहे, तरी म्हणे माझ्या इमानाबद्दल मोंगल सरकारला संशय येईल! ( किंचित् थांबून ) मोंगलांच्या दृष्टीनें पाहिलें तर संशय उत्पन्न होण्याजोगीं कारणें घडलीं आहेत खरीं! पण त्याला माझा तरी काय इलाज आहे? आपलें दुर्दैव म्हणावें! आतां आमच्या दुधखुळ्या हेकट राणीसाहेब जिजीच्या बाळंतपणासाठीं भोंसल्यांच्या घरीं जाणार म्हणतात, तसें घडलें तर मात्र हे मोंगल लोक मला तोंड बाहेर काढूं देणार नाहींत! सारी फटफजिती होऊन एखादें मोठेंच संकट ओढवेल! याकरतां याचा पक्काच बंदोबस्त केला पाहिजे. संसारांत प्रतिकूल भार्या हें मोठेंच शल्य आहे, पण इतर शल्यांप्रमाणें याही शल्याचा परामर्श नाजूक हातानें जपूनच केला पाहिजे. बभ्रा होऊं देतां उपयोगी नाहीं!

---

## प्रवेश २ रा.

**स्थळ:**—सिंदखेड. जाधवरावांचा वाडा, म्हाळसाबाईचा महाल.

( म्हाळसाबाई चिंताक्रांत उभी आहे. )

**म्हाळसा:**—काय करावें आतां यांच्या या दुराग्रही स्वभावाला! जिजाऊ आणि तिचा नवरा यांचा सत्यानास कसा पाडतां येईल या काय त्या उठल्या बसल्या यांच्या मसलती! भोंसल्यांचें भांडण आजकालचें नाहीं. तें फार वर्षें चाललें आहे. पण दावा उगवण्याच्या असल्या दुष्टपणाच्या युक्ति आजपर्यंत कांहीं यांना कधीं सुचल्या नाहींत! हा मेला इसामिय्या इथे आला आहे, याची संगत लागल्यापासून यांचें मन अगदींच बहकलें! जिजीला मुलगा होणार तो कसें तरी

करून नाहींसा करावा हा इसामिय्याच्या मनानें घेतला आहे ध्यास, आणि तो अक्कल शिकवतो आणि त्याप्रमाणें हे नाचायला तयार होतात! याला म्हणावें तरी काय? आज देवघरांतून मुद्दाम गीता आणि गंगाजल छावणींत मागून नेलें आहे, हें कशा-करितां बरें असेल? कांहीं तरी जबरदस्त निर्धाराची शपथ इसामिय्यानें स्वारीकडून घेववली असावी; पण शपथ असावी कशाबद्दलची? आईचें सारें लक्ष लेंकराकडे साहजिक असणार, त्यामुळें माझें मन मला सांगतें कीं, या शपथेशीं जिजीचा कांहीं-तरी संबंध असलाच पाहिजे. ( किंचित् थांबून ) हो. हा माझा तर्क कधीं कधीं खोटा व्हायचा नाहीं! जर यानी जिजीचें कांहीं बरें वाईट करण्याची शपथ घेतली असेल तर तिला वांचवण्याचा मलाही उपाय पाहिलाच पाहिजे! जर मी स्वारींत यांच्याबरोबर असतें तर या गोष्टीचा कांही तरी बंदोबस्त करतां येता, पण मला बरोबर नेणार कोण? ( जाधवरावास येतांना पाहून ) स्वारी इकडेच येते आहे, ती बहुधा माझा निरोप घ्यायला येत असेलसें वाटतें. आतां जिजीबद्दल एकदां शेवटची विनवणी करून हे काय म्हणतात तेवढे तरी ऐकूं या. मग पुढचा विचार! ( जाधवराव येतो. )

**जाधव०**:—राणीसाहेब, उद्यां लष्करचें कूच होणार आणि आम्ही सुद्धां उद्यांच निघणार.

**म्हाळसा**:—उद्यांच निघायला पाहिजे? बरें तर! जाण्यापूर्वी माझें मन निश्चिंत करून मग जावें एवढेंच माझें मागणें!

**जाधव०**:—तुमच्या मनाला चिंता? आणि कशाबद्दल? आत्तां तुमची चिंता दूर करतों! बोला काय तें?

**म्हाळसा**:—एका बाबतींत मला आपणाकडून पक्कें वचन मिळेल तरच माझी चिंता दूर होईल. मी कांहीं फार मागत नाहीं आणि भलतेंच मागतें असेंही नाहीं!

**जाधव०**:—कोणतें वचन तुम्हांला पाहिजे?

**म्हाळसा**:—जिजीला धरायच्या उद्योगांत कधीं पडणार नाहीं असें आपले वचन मला मिळालें पाहिजे. माझें एवढेंसें मागणें नाहीं का मान्य करायचें होणार?

**जाधव०**:—( स्वगत ) उंः! यांत काय आहे? जिजीनें हें वचन माझ्याकडून पूर्वीच घेतलें आहे, तेव्हां तेंच वचन हिला देण्यांत कांहींच अवघड नाहीं! (उघड) राणीसाहेब, तुम्ही मागतां तें वचन तुम्हांला दिलें!

**म्हाळसा**:—दिलें?

**जाधव०:**—होय. खचित दिलें. आतां झालें ना ?

**म्हाळसा:**—( स्वगत ) माझ्या तोंडून शब्द निघाल्याबरोबर हे कबूल झाले यावरून आजची शपथ जिजीला धरण्याबद्दलची नव्हे हें तर उघड झालेंच. शपथ तर जिजीबद्दल असावी ही माझी खात्री आहे. तर मग कशाबद्दल शपथ घेतली हें विचारूं का ? पण विचारूं तरी कसें ? तें कांहीं नाहीं. स्वारींत यांच्याबरोबर राहून जेव्हां यांच्यावर पहारा करीत बसावें, तेव्हां मनाची काळजी दूर होणार. पण मी बरोबर येतें असें आपण होऊन म्हणेन तर तीही पंचाईतच ! आतां कसें करावें ?

**जाधव०:**—आम्हीं तुमचें बोलणें मान्य केलें. आतां आमचें बोलणें तुम्हीं मान्य केलें पाहिजे.

**म्हाळसा:**—आपल्या आज्ञेबाहेर मीं कधीं तरी गेलें आहें का ? सांगावें, आपली काय आज्ञा आहे ?

**जाधव०:**—माझी आज्ञा अशी आहे कीं या स्वारींत तुम्हीं माझ्याबरोबर नेहमीं रहावें.

**म्हाळसा:**—( हर्षानें ) मी ? मी कशाला यायला पाहिजे ?

**जाधव०:**—भीमाशंकराच्या यात्रेला जायचा आपण नवस केला आहे नव्हे का ?

**म्हाळसा:**—( हंसत ) होय. पण इतक्या धांदलींत तो नवस फेडायचें हें कुठून मनांत आलें बाई !

**जाधव०:**—देवाचा नवस. तो फेडायचा ठेवूं नये हें उत्तम.

**म्हाळसा:**—नको. मी रहातें आपली घरींच. आपण जावें निघून.

**जाधव०:**—( स्वगत ) घरीं रहातें म्हणे ! कशाला ? त्या द्वाड पोरीच्या बाळंतपणासाठीं भोंसल्याच्या घरीं पळून जायला होय ? पण मी कुटे तुला मोकळी सोडतों आहें ? ( उघड ) बस्स ! बस्स ! तुम्हांला बरोबर न्यायचें आम्हीं ठरवलें आहे तें आतां फिरावयाचें नाहीं. करा, प्रवासाची काय तयारी करायची असेल ती जलदीनें करा. मी येतों आतां. ( जातो. )

**म्हाळसा:**—( आनंदानें ) आतां हें सारें मनाप्रमाणें ठीक झालें. मी यांच्याजवळ स्वारींत नेहमीं रहाणार, तेव्हां यदाकदाचित् जिजी जर यांच्या हातीं लागली, आणि तिचा हे कांहीं घातपात करूं लागले, तर यांना अडथळा करतां येईल. जाधवरावांच्या दौलतींत हेच तेवढे मालक आणि मी म्हणजे कोणीच नव्हे असें नाही कांहीं !!! ( जाते. )

---

## प्रवेश ३ रा.

**स्थळः**—माहुलीच्या किल्ल्याचा पायथा.

( कमालखान येतो. )

**कमाल०:**—शहाजी भोंसल्याला आणि त्याच्या सुलतानाला आम्ही या माहुलीच्या किल्ल्यांत कोंडून धरलें, सभोंवतीं चौक्या बसवून आंत बाहेर माणूस फिरकायचें बंद केलें, मोर्चे बांधून तोफांचा मार दिला, तरी हा शहाजी हमेशा लढाया करून आम्हांला हुसकून लावतोच आहे ! चौक्यांवर छापे घालून कत्तल करतोच आहे ! आणि मोर्चे उधळून देतोच आहे ! मोंगल सरकारला शरण यावें ही अक्कल अजून याला सुचत नाहीं, तेव्हां बडा मगरूर समजला पाहिजे ! बरें आहे. आज म्हणावें तुझीं शंभर वर्षें पुरीं भरलीं. जाधवरावांनीं आज रात्रीं छापा घालून मुळीं तुझा किल्लाच काबीज करण्याची तयारी केली आहे, तेव्हां तुम्ही किल्ल्यांतले सारेच लोक आमच्या कैदेंत सांपडतांच आहां ! ( तिरस्कारानें हंसत ) आमचे मिय्यासाहेब आणि राजेसाहेब मला मागमूस लागूं नये म्हणून आपल्या मतें चोरून फितुराच्या मसलती ठरवतात; मला जवळ फिरकूंसुद्धां देत नाहींत, पण म्हणावें बेव्यांनों, तुम्हीं नाहीं सांगितलेंत तरी माझे डोळे आणि कान तर कुठे गेले नाहींत ना ? मिय्यासाहेबांनीं शत्रूच्या फौजेंत फितूर माजवला आहे, छाप्यानें किल्ला घेण्याचे बेत ठरताहेत, ही कुजबुज आज कित्येक महिने मी या लष्करांत ऐकतोंच आहें. त्यांतून आज जाधवरावांच्या गोटांत गुपचुप तयारी चालली आहे. हिलाल, चंद्रज्योती, शिड्या, घोरपडी वगैरे सामान गोळा होतें आहे, शिपायांची निवड चालली आहे, या बातम्या मला कळल्याखेरीज राहिल्या आहेत कुठे ! एकूण काय, तर आज रात्रीं किल्ल्यावर हल्ला होणार आणि त्यांत सुलतानासुद्धां शहाजी धरला तरी जाईल, नाहीं तर मारला तरी जाईल ! असो. शहाजीचा निकाल तर असा हा लागणारच. पण छाप्याच्या गर्दींत रायबा भोंसला माझ्या तावडींतून निसटून गेला तर काय करावें ? आजच कुठे तरी त्याला गांठावें म्हणतों आहें, पण तो सांपडायचा कसा ? किती धुंडाळावें या लुच्चाला ! या रायबावर माझा फार दिवसांपासून दांत आहे. यानें माझी मिरवणूक काढलेली आहे, आणि मला काठ्या मारलेल्या आहेत; त्याचा वचपा नको मला काढून घ्यायला ? ( हांक मारतो. ) अरे ए रायबा भोंसल्या ! आतां कां दडून बसला आहेस ?

मर्द असलास तर मरायला माझ्या समोर हजर हो. औरत असलास तर बस तोंड लपवून ! ( एक म्हातारी काठी टेकीत टेकीत येते. तिला पाहून हंसतो. ) रायबाला हांक मारतों आहें, आणि ही कोण म्हातारी इथे आली ? हरकत नाहीं. हिलाच विचारूं रायबाची बातमी. ए म्हातारी, रायबा भोंसला म्हणतात तो कुठे आहे ? बोलना ? अशी भुतासारखी माझ्याकडे टक लावून काय बघतेस ? तुला बोलायला काय झालें ? शहाजी भोंसल्याजवळ शरणचिठी मागणारा मी जंगबहादूर कमालखान विचारतो आहें, आणि ही थेरडी उत्तर देत नाहीं म्हणजे काय गोष्ट आहे ? मगरूर बुढ्ढी ! मी गांजा ओढतों आणि तुझ्या डोळ्यांवर धूर ! ( म्यानां-तून पट्टा काढून ) आतां उत्तर न देशील तर अशा सफाईनें पट्टयाचा हात मारीन कीं तुझें डोचके त्या झाडाच्या फांदीवर अडकलेलें तूंच पहाशील ! ( म्हातारी त्याला काठ्या मारते. तो मार चुकवीत ओरडतो. ) ए लढाऊ बुढ्ढी ! मारतेस काय म्हणून ? मारूं नकोस. अगदीं थेट रायबा भोंसल्याप्रमाणें मला काठ्या मारायची ही हौस तुला कां आली आहे ? ओ यो यो यो ! मारूं नकोस अम्मा ! मी बायकांशी लढत नसतों. मी बेअब्रूचा शिपाई नाहीं ! मी नाहीं तुझ्याशीं लढत ! ( हत्यारें फेकून देतो. ) तूं पुरुष होऊन ये, मग तुझे माझे दोन हात व्हायचे तर होऊन जातील ! ( रायबा म्हातारीचा वेष फेंकून देतो. ) अरे बापरे ! तूं तर रायबा भोंसला ! खरोखरीचा सैतान आहेस तूं ! मी नाहीं तुझ्याशीं लढायचा. मी तुला सोडून देतों !

**रायबाः**—तूं मला सोडून देतोस, पण मी कुठे तुला सोडतों आहें ? थांब. तुझी कणीक आणखी मऊ करायला पाहिजे ! ( काठ्या मारतो. )

**कमाल०ः**—( रडत ) अरे भाई ! कां माझा जीव घेतोस ? मारूं नकोस.

**रायबाः**—शिपाईगिरीचें कांहीं एक कसब ठाऊक नसतां ही हत्यारशाळा अंगावर बांधून एवढी तिस्मारखानाची ऐट तूं कां आणली होतीस ?

**कमाल०ः**—पेटके वास्ते जनाब ! पेटके वास्ते ! कोणी पोटासाठीं देशभक्त होतात, कोणी देवभक्त होतात, कोणी मांत्रिक होतात, साधु होतात, किमया कर-तात, छूं मंतर म्हणतात, भुतें गाडतात, त्यांना तूं मारीत नाहींस आणि मला गरीबाला कां मारतोस बाबा ?

**रायबा**:—नको मारूं ? बरें तर. नाहीं मारीत. पुन्हां शिपायाचा पेशा करशील तर खबरदार ! जाव. जलदी जाव ! पण थांब. ( त्याची पगडी हिसकून आपल्या डोक्यास घालतो. )

**कमाल०**:—जा म्हणतोस, पण जाऊं कसा ? माझी पगडी हिसकून घेतलीस तर काय बोडक्यानें जाऊं ?

**रायबा**:—बोडक्यानें जाऊं नकोस. पायांनीं जा.

**कमाल०**:—पण मी जाधवरावांचा हुद्देदार बडा माणूस. उघडें डोकें घेऊन चार लोकांत कसा जाऊं ?

**रायबा**:—चार चौघांत कसा जाऊं एवढीच पंचाईत ना ? थांब. तुला औरत बनवतों म्हणजे साराच बंदोबस्त झाला ! कुठे जायला नको, यायला नको !

**कमाल०**:—औरत बनवतों ! या अल्ला ! औरत होना ए क्या बुरी बात !

**रायबा**:—( त्याला म्हातारीचें चिरगुट नेसवून ) जा लेंका आतां भीक मागत !

**कमाल०**:—पण माझीं हीं हत्यारें फार मोलाचीं आहेत. हीं मला नेलीं पाहिजेत. हा कंदाहारी पट्टा, हा खुरासानी पट्टा, हा इस्तंबूलचा जंबिया, हीं आरबस्थानचीं पिस्तुलें, असलीं हीं नामी हत्यारें इथे टाकून मी नाहीं जायचा. ( हत्यारें बांधूं लागतो. )

**रायबा**:—कमालबिबी ! आतां शिपायाप्रमाणें हत्यारें बांधलेलीं तुला शोभायचीं नाहींत. थांब. ( हत्यारांची माळ करून त्याच्या गळ्यांत बांधतो. ) बिबी ! ही मोहनमाळा तुझ्या गळ्यांत खाशी शोभते ! जा आतां. शहाजी महाराजांजवळ शरणचिठी मागितल्याबद्दल हा तुला दुसऱ्यान्दां मार दिला आहे. याउप्पर तसली बात कधीं तोंडावाटे काढशील का ? बोल.

**कमाल०**:—उद्यां बोलेन.

**रायबा**:—उद्यां बोलेन ! आज कां नाहीं बोलत ?

**कमाल०**:—नाहीं म्हटलें, याचें उत्तर उद्यां सांगेन.

**रायबा**:—उद्यां काय सांगणार आहेस ? आत्तां सांग.

**कमाल०**:—आत्तां काय सांगूं ? शहाण्यानें करामत करून दाखवावी आणि मग बोलावें. उगीच वायफळ बडबड काय करायची ? तूं मला आज बडवलेस आणि वाटेल तसें बोलतो आहेस, मी गप्प बसलों आहें. उद्यां मी तुझ्या मानगुटीवर

वसेन तेव्हां तूं झुकत माझ्या पायां पडशील. मग मी कांहीं बोललों तर शोभेल. आज कशाला बोलूं ?

**रायबा**ः—तुझ्यासारख्या शेंदाड शिपायाच्या अंगांत माझ्या मानगुटीस बसण्याचा पराक्रम आज दिसून आला नाहीं तो उद्यां कुठचा येणार ?

**कमाल०**ः—नशिबाचें पारडें फिरलें तर जे आज अमीर ते उद्यां फकीर होत असतात बाबा ! आज तूं मला कुत्र्याप्रमाणें झोडपलेंस, पण उद्यां मीच किल्ल्यावर येऊन तुला अस्साच झोडपतों कीं नाहीं तें तुला दिसेलच !

**रायबा०**ः—( चपापून स्वगत ) हें काय बोलतो हा ? ( उघड ) अरे तूं काय किल्ल्यावर येतो आहेस ? कशाला सांगतोस या गोष्टी ?

**कमाल०**ः—कां बरें, आज रात्रीं जाधवराव हजारों शिपाई घेऊन किल्ल्यांत शिरणार आहेत, त्यांबरोबर मला यायला कोणची अडचण आहे ? मी तर सर्वांच्या पुढें असणारा !

**रायबा**ः—( स्वगत ) हें काय भयंकर अरिष्ट ! ( उघड ) जा जा ! जाधवराव किल्ल्यांत येतात म्हणे ! दरवाज्यावर किल्लेदाराचे पहारे आहेत, सुलतानाची फौज किल्ल्याच्या माचीस कंबरा बांधून रात्रंदिवस फिरते आहे, आणि हे सारे लोक तुझ्या मतें झोपाच काढीत असतील नाहीं बरें ?

**कमाल०**ः--अरे तुम्ही बेफाम मरगट्ट ! तुम्ही असेच खुषींत गाजरें खात मरायचे ! मोंगलाई कावा तुम्हाला काय ठाऊक आहे ? तुझा तो किल्लेदार आणि ती सुलतानाची फौज आणि तिचे ते सरदार चटसारे आम्हांला सामील झालेले आहेत !!! या मसलतीची उभारणी करण्यांत इसामिय्यानीं पाण्यासारखा पैसा ओतला आहे तो फुकटच वाटतें !

**रायबा**ः--( स्वगत ) फितुराचा छडा लावण्याविषयीं महाराजानीं आज्ञा केल्यावरून नानाप्रकारचीं सोंगें घेऊन सुलतानाच्या फौजेभोंवतीं मी इतके दिवस घिरट्या घालतों आहें, त्याचें चीज आज हा गांजेकस मला भेटला म्हणूनच झालें ! एरवीं ही भयंकर बातमी कशानें फुटणार होती ?

**कमाल०**ः--मी सांगतों ही फार फार नाजूक गुप्त गोष्ट आहे. कुणाजवळ सांगायची नव्हे म्हणून तुला सांगितली. खोटी वाटत असेल तर बारीक तपास करून पडताळा घे म्हणजे खात्री होईल.

**रायबा**:—( स्वगत ) तें खरेंच आहे. नुसत्या एका गांजेकसाच्या बोलण्याचा भरंवसा काय धरावयाचा ? पडताळा हा पाहिलाच पाहिजे.

**कमाल०**:—मेंढरावर जसा लांडगा तसा उद्यां तुझ्यावर हल्ला करणारा मी कमालखान ! समजलास ? आज जातों आतां. सलाम.

**रायबा**:—( त्याला पकडून ) अरे, चाललास कुठे ? तूं आतां जें बोललास तें शहाजी महाराजांसमोर बोलून दाखव. चल.

**कमाल०**:—कशाला ? कडेलोट करून घ्यायला ?

**रायबा**:—छे छे, अगदीं भिऊं नकोस. ते तुला मारायचे नाहींत आणि मी मारूं देणार नाहीं. शिवाय तूं मागत असतोस ती शरणचिठ्ठी त्यांच्याकडून तुला खचित खचित देववतों. ( ओढूं लागतो. )

**कमाल०**:—नको नको ! मला कांहीं नको ! सोड मला ! मी तुझ्या पायां पडतों. ( रडूं लागतो. रायबा त्यास ओढीत नेतो. )

---

## प्रवेश ४ था.

**स्थळ**:—जंगल.

( जाधवराव व इसामिय्या येतात. )

**इसा०**:—एकूण शहाजी भोंसला काल रात्रीसच सुलतानाला बरोबर घेऊन किल्ल्यांतून पळून गेला आं ? अगदीं हातांत सांपडावा इतक्यांत निसटला !

**जाधव०**:—जाईना कां ? पाहूं या, पाहूं या कुणीकडे जातो आहे तो !

**इसा०**:—पाहूं या काय ? त्याची थोरली मराठी फौज पुण्यानजीक आलीच आहे. तेथपर्यंत त्यानें पल्ला गांठला कीं साराच मामला बुडाला ! मग कसूचा तो आम्हांला आंवरतो !

**जाधव०**:—पण पुण्याकडे त्याला जाऊं देतो कोण ? तो नाण्याच्या घाटाकडे पळाला ही बातमी रात्रीसच मला लागली आणि त्याच क्षणीं मी जगदेवरावाला फौज बरोबर देऊन दुसऱ्याच एका घांटानें पुढें पाठवलें आहे. तो संध्याकाळचे सुमारास शहाजीच्या मार्गांत आडवा येऊन त्याला थांबवून धरील, तों मागून

आम्ही जाऊन पोंचतोंच आहों. आजचा घाट असा घातला आहे कीं शहाजी, त्याची बायको आणि सुलतान, सारींच बिनचूक आमच्या हातीं लागावीं.

**इसा०**:--( स्वगत ) निदान शहाजीची बायको जरी सांपडली तरी देवच पावला म्हणायचा !

**जाधव०**:—त्यांतून शहाजीचें आणि सुलतानाचें वांकडें यावें म्हणून तुम्हीं जी शक्कल योजिली आहे, ती साधली तर फारच बहार होईल.

**इसा०**:—होईल तेव्हां खरी ! मला तर आतां कोणच्याही गोष्टीचा भरंवसा येत नाहीं. काल रात्रीचा छापा साधला असता तर आज शहाजीच्या पाठीस लागून स्वतःची त्रेधा तिरपीट करून घेण्याचें काय कारण होतें ? पण आमचें दुर्दैव जिथे तिथे आडवें येतें आहेना ? कोणी हरामखोरानें बातमी फोडून कारस्थान बुडवलें देव जाणे !

**जाधव०**:—जाऊंद्या हो, बातमी फुटून काय नुकसान व्हायचें तें होऊन गेलें. ती बातमी कशी फुटली, कोणीं फोडली, याची पंचाईत आतां करून काय उपयोग ?

**इसा०**:—राजेसाहेब, शहाजी भोंसल्याचे ताले शिकंदर आहेत यांत शंका नाहीं. तुम्ही असें पहा, कीं जिजाऊला धरण्याची आणि शहाजीला जेर करण्याची जी जी युक्ति आम्हीं काढावी ती ती निष्फळ होऊन आमच्या नुकसानीला कारण व्हावी, अस्सें एकसारखें चाललें आहे ! आज तरी शहाजी सांपडतो कीं नाहीं कुणाला ठाऊक ? माझें तर मन निराश झालें आहे.

**जाधव०**:—छे. छे. मिय्यासाहेब ! असा धीर सोडून कसें चालेल ? हिंमत मर्दा तो मदत खुदा ! पराक्रमाच्या जोरावर मसलत तडीला नेण्याची हिंमत सोडावी, आणि दैवाच्या नांवानें खडे फोडावे हें नादान भित्र्या माणसाचें काम ! तुम्हांला तें योग्य नाहीं. या मोहिमेंत आम्हांला हिसके बसणार, ठेंचा लागणार, संकटें येणार, हें मला आरंभींच कळलें आहे; पण मीं कधीं धीर सोडला आहे ?

**इसा०**:—हें सारें तुम्हांला पूर्वीच कळलें होतें एकूण ?

**जाधव०**:—कां बरें ? घराहून निघायला मुहूर्त चांगला लाभला नाहीं असें मीं नव्हतें तुम्हांला सांगितलें ? शिवाय सिंदखेडच्या मुक्कामीं माझ्या डेऱ्यांत घुबड शिरलें होतें तें आठवतें आहेना ? त्याचा तो अपशकुनी शब्द माझ्या कानावर पडला तेव्हांच माझ्या मनाला धक्का बसला. मला वाटतें, तें घुबड अजून लष्करा-

बरोबर फिरतेंच आहे! कशावरून म्हणाल, तर अजूनसुद्धां केव्हां केव्हां माझ्या जवळपास तेंच घुबड ओरडल्याचा भास होतो आणि पोटांत धस्स होतें! (घुबडाच्या ओरडण्यासारखा शब्द ऐकूं येतो. जाधवराव दचकतो.) ऐका. ऐका. पुन्हां तेंच घुबड! तेंच घुबड ओरडतें आहे! अजूनसुद्धां माझी पाठ सोडीत नाहीं! कुठे आहे तें? मारून टाकतों त्याला! (पाहून) तें पहा! तें पहा! मिय्याजी, त्या झाडाच्या बुंध्याशीं घुबडाचें तोंड दिसतें आहे. (निरखून) नाहीं. पण तें तोंड घुबडाचें कीं वानराचें तें नीटसें कळत नाहीं. शब्द मात्र तिकडून येतो आहे खरा! जाऊंद्या कीं! घुबड अथवा वानर कोणी कां असेना? तीर मारून त्याचा जीव घेतों म्हणजे एकदांची पीडा टळली आणि निश्चित झालों! (तीर मारूं लागतो.)

**इसा०:**--(गडबडीनें) थांबा, थांबा. घाई करूं नका. तिथे घुबड अथवा वानर नसून कोणी माणूस असला तर त्याच्या हत्येचें पाप कशाला माथीं घेतां? आधीं मी जवळ जाऊन काय प्रकार आहे तो पाहतों. थांबा. (झाडाजवळ जातो व मोठ्यानें हंसतो.) राजेसाहेब, या या लवकर. ज्याला तुम्ही घुबड म्हणून मारणार होतां तो हा आपला कमालखान इथे उभा आहे!

**जाधव०:**---(जवळ जाऊन) खरेंच कीं! तीर मारीत होतों तर नाहक मरून जात होता! याला कोणीं तरी झाडाला बांधून याच्या तोंडांत बोळाही घातला आहे! काय बिचाऱ्याची दुर्दशा! याला सोडवूं या. (सोडवतात.)

**इसा०:**—काय रे कमालखान, रायबा भोंसल्याला मारल्याखेरीज तोंड दाखवणार नाहीं म्हणून बोलला होतास ना?

**कमाल०:**--मग? मीं कधीं तुम्हांपुढें येऊन तोंड दाखवलें? तुम्हींच मुद्दाम जवळ येऊन माझें तोंड बघितलेंत त्याला मी काय करूं?

**जाधव०:**—रायबाला लढाईसाठीं धुंडाळीत होतास त्याची तुझी गांठ पडली कीं नाहीं!

**कमाल०:**—पडली तर! त्याची माझी खूपच बनून राहिली होती! अशी लढाई झाली, अशी मारामारी झाली, कीं कांहीं पुसूंच नका!

**इसा०:**—राजाजी, गांजा ओढून दोन पायांचा पशु बनलेल्या या मुरदाडाला काय विचारतां? खरी हकीगत काय काय झाली ती त्याच्या दुर्दशेवरून नाहीं का तुम्हांला समजत? रायबानें याची चांगली यथेच्छ पूजा करायची ती करून शिवाय

( म्हातारीचें चिरगूट हातांत धरून ) याला हा बहुमोल पोषाख बहाल केला आहे ! याच्या गळ्यांत हीं नानातऱ्हेचीं विचित्र पदकें त्यानेंच लटकावलेलीं दिसताहेत ! कमालखानी हार म्हणतात तो हाच बरें का !

**जाधव०:**—अरे कमाल, तुझ्या गळ्यांत ही चिठी रे कसली बांधलेली आहे ?

**कमाल०:**—हंसायला आणि टर उडवायला तुमचें काय जातें ? मीं मार खाल्ला, हाल करून घेतले, वाटेल तें केलें; पण शहाजी राजाची शरणचिठी त्या रायबाकडून घेतल्याखेरीज त्याला नाहींच सोडलें ! याला म्हणावें चिकाटी ! नाहीं तर तुम्ही ! मारे फौजा गोळा करून शहाजीशीं झटपट खातां खातां हातटेकीला आलांत आणि बसलां आहांत रोती सुरत करून !

**जाधव०:**—( हंसत ) पाहूं, पाहूं तुझ्या चिठींत काय लिहिलें आहे तें ? ( चिठी वाचतो. ) "हा मनुष्य ज्याच्या दृष्टीस पडेल त्यानें याचे आधीं कान कापावे, मग मान कापावी." हात् मूर्खा ! ही कसली शरणचिठी ! ही तर तुझी मरणचिठी आहे !

**कमाल०:**—( रागानें ) असलें लिहिलें आहे या चिठींत ? रायबा भोंसला किती लुच्चा माणूस आहे हो ? मला रात्रभर झाडाला बांधून तोंडांत बोळा कोंबून शेवटीं त्यानें चिठींत असला हलकटपणाचा मजकूर ल्याहावा काय ? बरें, फुकटच्या फुकट माझा जीव घ्यायचा तो घ्यायचा, आणि त्यांतसुद्धां माझी कांहींच सोय पहायची नाहीं म्हणजे काय हो ?

**इसा०:**—त्यांत कसली तुझी सोय पहायची ?

**कमाल०:**—आधीं मान कापून मग कान कापावे असें जर या चिठींत त्या रायबानें लिहिलें असतें तर त्यांत त्याच्या बापाचें काय जात होतें ? बरें आहे ! आज याचें उट्टें काढल्याखेरीज सोडीत नाहीं ! चला. आतां आधीं पहिलें काम मला किल्ल्यावर घेऊन चला, आणि रायबाला पकडून बांधून जमिनीवर पाडा; म्हणजे त्याला असा चोप देतों, असा लंबे करतों, कीं देखते रहना जवान !

**इसा०:**—( त्रासून ) मरूं दे तिच्या तो रायबा आणि तूंही मर जा ! आतां आम्हाला किल्ल्याकडे बघायलासुद्धां वेळ नाहीं.

**कमाल०:**—( आर्जवानें ) असें कसें बरें मिय्याजी ! काल मी रायबाला अगदीं निक्षून बजावलेलें आहे त्याप्रमाणें मला करून दाखवायला पाहिजे.

**इसा०:**—तूं त्याला काय बजावलें आहेस ?

**कमाल०:**—आज रात्रीं जाधवराव किल्ल्यावर छापा घालणार आहेत, तेव्हां त्यांबरोबर मी येऊन तुझ्या मानगुटीस बसेन; अस्सें मी बोललों आहें. अगदीं हेच शब्द !

**जाधव०:**—( क्रोधानें ) हे शब्द तूं रायबाजवळ बोललास ?

**कमाल०:**—बोललों म्हणजे ? रायबा म्हणजे कोणत्या झाडाचा पाला ! मी प्रत्यक्ष शहाजी भोंसल्यालासुद्धां डरलों नाहीं ! त्यालासुद्धां सारा मजकूर साफ सांगून टाकला !

**जाधव०:**—हात् गाढवा ! एकूण कालची आमची गुप्त मसलत शत्रूला कळवणारा तूंच घरभेद्या हरामखोर !

**इसा०:**—आतां या कमालखानाला काय चावूं कीं गिळूं असें मला झालें आहे. बातमी फोडून यानें केवढी नासाडी केली !

**कमाल०:**—रायबाला काय, आणि शहाजीला काय, छाप्याचा बेत मीं कळवला तो गुप्त गोष्ट म्हणून कळवलेला आहे; कोणाजवळ सांगूं नका असें बजावलेलें आहे. बातमी बाहेर फुटायची नाहीं. काळजी करूं नका !

**इसा०:**—डोंबल तुझें रांडलेका ! घात केलास चांडाळा ! ( कमचीनें मारतो. )

**जाधव०:**—आतां कशाला मारतां त्याला ? हें रत्न तुम्हींच माझ्या पदरांत बांधलेंत त्याचें घ्या हें फळ !

**इसा०:**—( स्वगत ) या गांजेकसाला जाधवरावांच्या नोकरींत मीं घातलें त्यांत माझी मुळापासूनच दुष्टबुद्धि होती; तिचें हें कडू फळ माझ्या नशिबानें आतां दिलें तें मला चाखलेंच पाहिजे !

**जाधव०:**—बाकी शहाजी भोंसला पळून गेला म्हणून त्याचें कांहीं इतकें वाईट वाटावयाला नको. काल रात्रीं सांपडायचा तो आज संध्याकाळीं सांपडेल इतकेंच ! आम्ही पाठीस लागल्यावर तो जाणार कुणीकडे ?

( जातात. )

**( अंक तिसरा समाप्त. )**

---

# अंक ४ था.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**:—जंगल.

( एक जासूद येतो. )

**जासूद**:—या घांटाच्या माथ्यावर जगदेवरावाच्या फौजेशीं शहाजी लढतो आहे, आणि सुलतान निजामशहा या झाडींत विश्रांतीसाठीं थांबला आहे, अशी संधि साधून मी या लष्करांत येथपर्यंत तर येऊन घुसलों. ( पत्र पाहून ) हें पत्र तर लिहिलें आहे शहाजीच्या नांवानें, पण पडलें पाहिजे नेमकें सुलतानाच्या हातांत! आतां असा हा योग जमवून आणायचा कसा? ( सुलतानास दुरून येतांना निरखून ) हो, हाच सुलतान! आतां साधली मसलत! तर आतां असें ओरडत सुटूं या! (ओरडतो.) अरे इथे हुजूरजवळ वागणारे कोण लोक आहेत? काय? खासबारदार, इटेकरी, पट्टेकरी, भालाईत, ढालाईत, हुजरे, कारकून, कोणीच नाहींत? कोणीच ओ देत नाहींत? आतां काय करावें? कोणी तरी या लौकर! हें पत्र घ्या आणि मला मोकळें करा! मला दुसरीं निकडीचीं कामें आहेत. मला गेलें पाहिजे. या लवकर!

**निजामशहा**:—( प्रवेश करून ) कोण तूं केवढ्यानें ओरडतो आहेस? सांग. तुझें काय काम आहे?

**जासूद**:—हें पत्र खुद्द हुजूरच्या हातांत देण्याबद्दल मला माझ्या धन्याचा हुकूम आहे.

**निजामशहा**:—कोण तुझा धनी?

**जासूद**:—( ऐटीनें ) राजा जगदेवराव जाधवराव.

**निजामशहा**:—( दचकून ) जगदेव जाधवराव?

**जासूद**:—होय. होय. राजा जगदेवराव जाधवराव! महाराजा लखुजी जाधवरावांचे बंधु! तूं हुजूरजवळचा माणूस आहेस काय? हुजूर कुठे आहेत? तूं कोण?

**निजाम०:**—तूं मला ओळखत नाहींस ?

**जासूद:**—नाहीं बा ! मी कशानें तुला ओळखणार ? असा कोण तूं मोठा सुलतान लागून गेला आहेस कीं ज्यानें त्यानें तुला ओखळेंच पाहिजे ! मी नाहीं तुला ओळखीत !

**निजाम०:**—( स्वगत ) नाहीं ओळखीत तेंही बरेंच ! कोणी ओळखूं नये म्हणून तर या मोहिमेंत मी साध्या पोषाखांत साधेपणानें वागत असतों. पण जाधवरावाचें पत्र माझ्या हातांत द्यायचें हा बोलतो हें काय आहे ? जाधवराव मला कशाला पत्र लिहील ? काय पत्र आहे तें तरी पाहूं या. ( उघड ) अरे, प्रत्यक्ष हुजूरच्या हातांत तुझें पत्र जायला पाहिजे ना ? तर मग तें मला दे म्हणजे झालें !

**जासूद:**—हें घे तर मग ! जाऊं दे मला ! ( पत्र देतो व जातो. )

**निजाम:०**—( पत्र वाचून ) काय ही भयंकर दगलबाजी ! हें पत्र जगदेवानें शहाजी भोंसल्याला लिहिलें आहे ! एकूण हुजूर हुजूर म्हणून ज्याला जासूद म्हणत होता तो शहाजी भोंसला ! मी नव्हे ! भोंसल्याच्या हातांत पत्र जायचें तें जासूदानें गफलतीनें माझ्या हातांत दिलें आणि त्यामुळें हा दगलबाजीचा बेत माझ्या नजरेला येतो आहे ! ( रागानें ) तो हरामखोर जाधव काय म्हणतो या दगलबाज भोंसल्याला ! ( पत्र पाहून ) " तुम्हीं कबूल केल्याप्रमाणें सुलतानाला दौलताबादेंतून काढून माहुलीच्या किल्ल्यांत नेलेंत. तेथें तुमच्या आमच्या बेताला निजामशाही फौज कबूल होईना, सबब सुलतानाला त्याच्या फौजेतून काढून दूर या जंगलांत आणलेंत. संकेताप्रमाणें आम्हीही जवळ येऊन ठेपलों. मोंगलसरकारचा व तुमचा करार ठरला आहे त्याप्रमाणें सुलतानास आमच्या हवालीं करा; म्हणजे करारांत देऊं केलेली. जहागीर तुमची तुम्हांला देववण्यांत येईल." ( खेदानें ) या अल्ला ! काय तूं डोळे झांकलेस म्हणून हे बेइमानाचे सैतानी खेळ तूंच पैदा केलेल्या या दुनियेंत धिंगाणा घालीत आहेत ! ज्याच्या पायीं मी मोंगलबादशाहीचा कट्टा दुष्मन बनून माझें राज्यही गमावायला तयार झालों, तोच हा दगलबाज मरगट्टा शहाजी खाटकाच्या हातीं बोकड दिल्याप्रमाणें मला माझ्या शत्रूच्या हवालीं करून जहागीर मिळवणार ! आणि एवढ्याचसाठीं या दुष्टानें माझ्या फौजेंतून मला काढून येथपर्यंत दूर आणलें आं ? गोड बोलून हळूच गळा कापणाऱ्या या नादान भोंसल्याच्या नादीं लागून मी राजधानीला, राज्याला आणि माझ्या

जिवाला जीव देणाऱ्या इमानी फौजेला पारखा होऊन या परकी मरगट्ट्यांच्या फौजेंत येऊन पडलों आणि याचा शेवट ग्वालेरच्या किल्ल्यांतला बंदीखाना ! बस्स ! बस्स ! समजली नशिबाची परीक्षा ! या सुलतानाच्या कपाळीं राज्य करायचें नसेल तर नसो, पण एवढें तरी याला खचित ठाऊक आहे कीं, शत्रूच्या कैदखान्यांत ऐष-आरामानें आयुष्य घालवून पाजी म्हणवून घेण्यापेक्षां गाजी होऊन लढाईंत शत्रूला मारतां मारतां मरून जावें हेंच सुलतान मूर्तुजा निजामशहाला योग्य आहे ! ( तरवार उपसून जाऊं लागतो तों रक्तानें न्हालेला शहाजी आडवा येतो. )

**शहाजी**:—हां हां ! खुदावंत, हें काय ? कोणती मजल गांठण्याचा विचार आहे ?

**निजाम०**:—कोणती मजल ? मजल स्वर्गाची ! या समशेरीनें दहा वीस दुश्मानांना नरकाची वाट दाखवून मी स्वर्गाची मजल गांठणार !

**शहाजी**:—अलबत ! तसाच बाणीचा वक्त गुदरेल तर हा समशेर गाजवण्याचा रस्ता दुरुस्त आहे. पण आतां कोस दोन कोसांच्या फेऱ्यांत एकही शत्रु फिरकतांना दिसून येत नाहीं. सबब आपणाला इतकें जिवावर उदार होण्याचा प्रसंग आज तरी आलेला नाहीं !

**निजाम०**:—शत्रु आसपास एकही राहिला नाहीं असें तुम्ही म्हणतां, पण मघांशीं शत्रूचा हल्ला आला तो परतवण्यासाठीं म्हणून तुम्ही माझ्याजवळून निघून गेलांत हें खरेंना ?

**शहाजी**:—होय. पण तो हल्ला मीं शिकस्तीची मेहनत करून मागें परतवून लावला आहे. जे जे दुस्मान आमच्या तडाक्यांत सांपडले ते आम्हीं मारले, तोडले आणि पळवून लावले ! आम्हांपुढें कोणाचाही टिकाव लागला नाहीं. सर्वांची दाणादाण होऊन गेली. हा प्रताप आपल्या सद्दीचा आहे. आपल्या सद्दीची शौरत जोंपर्यंत गाजत आहे तोंपर्यंत कमरेच्या तरवारीला आपण खुशाल विश्रांति द्यावी. ही लढाईंत मरून जाण्याची भलतीच गोष्ट एकदम आपल्या मनांत कां यावी याचें कारण समजत नाहीं.

**निजाम०**:—( उपरोधानें ) कारण पाहिजे तुम्हांला ? हें पत्र वाचा ( पत्र देतो. )

**शहाजी**:—( वाचून ) ही तर मोंगलांची उघडउघड दगलबाजी दिसते आहे.

**निजाम०**:—कशावरून ?

**शहाजी**:—कशावरून ? मी विश्वासघात करून खुदावंत, आपल्याला शत्रूच्या हवालीं करीन अशी शंका आपल्या मनांत आली तरी कशी ? मलिकंबरानें मरतेवेळीं

हुजूरचा हात माझ्या हातांत दिला; फत्तेखान वजीर त्याचा मुलगा असून त्याच्या हातीं दिला नाहीं, इतका त्या पुण्यवान् वजीराचा माझ्या ठिकाणीं विश्वास ! हा विश्वास मातींत घालून मी माझ्या अन्नदात्याला केवळ जहागिरीच्या क्षुद्र लोभानें शत्रूच्या हवालीं करीन असें ज्याअर्थी आपणाला वाटलें, त्याअर्थी आपलें राज्य संभाळण्यासाठीं मीं जिवापाड मेहनत केली ती व्यर्थच झाली म्हणायची ! माझ्या शब्दांनीं माझ्या इमानाबद्दल विश्वास आपल्याला पटला नसेल तर आपल्या बचावासाठीं आतांच जे शत्रूच्या तरवारीचे घाव मीं सोसले, त्यांनीं तरी माझ्या इमानाबद्दल आपली खात्री व्हायला पाहिजे होती ! आजपर्यंतची माझी सेवा व्यर्थ गेली, जाऊं दे ! वाणीनें निष्ठा प्रदर्शित केली ती फोल ठरली, ठरूं दे ! पण हें भोंसल्याचें इमानी रक्त विश्वासघाताचा आरोप सहन न झाल्यामुळें जखमांच्या द्वारें जोरजोरानें बाहेर उसळून आपल्या संशयाचा निषेध करीत आहे हें तरी लक्षांत घ्या ! शत्रूचे वार घेतांना मला जितक्या यातना झाल्या नाहींत तितक्या यातना मला आपल्या शब्दांमुळें होत आहेत ! !

**निजाम०ः**—( स्वगत ) हा काय हें नाटक करून दाखवतो आहे, कीं मनापासून खऱ्या खऱ्या भावानें बोलतो आहे, हें कांहींच समजत नाहीं.

**शहाजीः**—खुदावंत, असले लबाडीचे खेळ करून विरुद्ध पक्षांत अविश्वास व फाटाफूट उत्पन्न करण्याचा मोंगलांचा शिरस्ता पूर्वीपासूनचा आहे. असेंच कपट लढवून मागें त्यांनीं चांदबिबीचा प्राण घेतला ! दौलताबादेंत माझ्यांत व आपल्यांत फूट पाडण्याकरतां मोंगल खचित उद्योग करतील ही काळजी माझ्या मनांत वावरत असल्यामुळें आपणाला घेऊन मी या जंगलांत आलों, तरी इथेही शत्रूनें आमची पाठ पुरवलीच आहे ! हरकत नाहीं. आजची मजल निभावली म्हणजे असली दगलबाजी करणारे आमचे दुस्मान नेस्तनाबूत करण्याचें सामर्थ्य आम्हांला खचित येईल. ( रायबा येतो व शहाजीच्या कानांत कांहीं मजकूर सांगतो. ) ( चपापून हळू स्वरांत रायबास ) रायबा, असें झालें म्हणतोस ? हा काय नवीनच घोंटाळा उत्पन्न झाला आहे ? ( निजामशहास ) हुजूर, मी क्षणभर पिछाडीला जाऊन आलोंच समजावें ! ( जाऊं लागतो. )

**निजाम०ः**—( स्वगत ) हा पिछाडीला जातो, तर मोंगलांनीं माझ्यावर हल्ला करण्याची हीच खूण नसेलना ? ( शहाजीचा हात धरून ) वजीर, खुदाची याद

करून खरें बोला. तुमच्या मनांत मला दगा करण्याचा इरादा नाहीं ना? तसा तुमचा इरादा नसेल तर माझा बचाव करण्याविषयीं मला तुमचें वचन मिळालें पाहिजे.

**शहाजीः**—वास्तविक वचन देण्याघेण्याचें कांहींच कारण नाहीं. पण त्याखेरीज आपली खात्री होत नसेल तर हेंच माझें वचन कीं—अशाही संकटांत सर्वस्व गमावण्याचा, बायकापोरांना किंबहुना देहाला सुद्धां पारखा होण्याचा प्रसंग आला तरी फिकीर नाहीं. परंतु सुलतान मूर्तुजा निजामशहा ! मी मोंगलांपासून आपलें रक्षण करीन एवढेंच नव्हे, तर त्यांचा पराजय करून त्यांची दाणादाण करीन, आणि दौलताबादेस नेऊन पुन्हां तेथें आपली स्थापना करीन, तरच मी भोंसल्यांच्या वंशींचा म्हणवीन हें सत्य, सत्य आहे !

**निजाम०:**—बहोत अच्छा ! तुम्ही पिच्छाडीला जातां ते लवकर परत या. एक घटका मी वाट पाहीन. त्या मुदतींत तुम्ही माझ्याजवळ आलां नाहींत तर वचन दिल्याप्रमाणें तुमच्या मनांत वागायचें नाहींसें समजून मी मोंगल फौजेवर हल्ला करून मरून जाईन. त्या पहा शत्रूच्या झुंडी पुन्हां दिसूं लागल्या ! फारच जलदीनें जाऊन याल तर पुन्हां जिवंतपणीं माझी भेट तुम्हांला होईल !

**शहाजीः**—आपल्या मनाची इतकी चलबिचल झाली असतां आपणाला क्षणभरसुद्धां सोडून मीं जाऊं नये. पण कांहीं एक अकल्पित संकट एकदम पुढें उभे राहिल्यामुळें मला जावें लागतें याबद्दल लाचार आहें. बनेल तर घटकाच काय, पण त्याच्याही आंत मी आपणाजवळ येतों. त्याची काळजी नको !

**निजाम०:**—( स्वगत ) हा तर असें बोलतो. आणि शत्रूचा तर पुन्हां चालून येण्याचा इरादा साफ दिसतो. या आणीबाणीच्या वेळीं मीं कसें वागावें? कसें वागावें? जें दौलताबादेच्या सुलतानाला शोभेल तसेंच मीं वागलें पाहिजे, आणि वजीर परत येईपर्यंत शत्रु जर मुकाबल्याला आला तर हिमतीनें आणि हुशारीने लढून त्याला थांबवून धरलेंच पाहिजे ! ( जातो. )

---

# प्रवेश २ रा.

**स्थळः—**सह्याद्रीचें जंगल.

( जिजाऊ दुःखी मुद्रेनें उभी आहे. शहाजीने तिला सांवरून धरले आहे. रायबा अंतरावर उभा आहे. )

**जिजाऊः—**नाही नाहीं. यापुढें एक पाऊल देखील जाण्याची शक्ति मला उरली नाहीं. गर्भाला चळवळ सोसत नाहीं. प्राण कासावीस होतात.

**शहाजीः—**हरकत नाहीं. घोड्यावर बसूं नका. पालखींतून चला. कसें तरी करून आणखी थोडी तसदी तुम्हाला सोसलीच पाहिजे. अघाडी शत्रूशीं लढत लढत मार्ग काढीत आहे, आणि पिछाडी कोसभर मागे राहिली तर कसें चालेल? एकाची एकाला दाद तर लागली पाहिजेना? कोणीकडून केव्हां छापा येईल याचा काय बरे नेम आहे? चला! पालखी हळू चालवूं. सारेंच लष्कर धीरे धीरे चालवतो. पण या संध्याकाळच्या वेळीं इथे थांबूं नका.

**जिजाऊः—**मी तरी काय करूं? थोडा विसावा मिळून पोटांत स्थिरस्थावर झाल्याखेरीज पालखीतूनसुद्धां जाण्याचे सामर्थ्य मला नाही

**शहाजीः—**आतां कसे करावे या अडचणीला! ( कारकून धांवत येतो. )

**कारकूनः—**महाराज! महाराज!! मोंगलांचें लष्कर आमच्या पाठीवर येऊन भिडलेच म्हणून समजावे.

**शहाजीः—**आं! आणखी हे कोठलें मोंगलांचे लष्कर आमच्या पिछाडीला आलें म्हणतां?

**कारकूनः—**ही फौज मोंगलाई आणि मराठी अशी दोन्ही प्रकारची असून आघाडीस इसामिय्या आणि मागून जाधवराव येत आहेत. आमचा हेर त्या लष्करांतून पुढें पळत आला, त्यानेंच ही वर्दी दिली. त्याच्या सांगण्यावरून पाहिलें तर शत्रु दोन तीन कोसांवर आला असावा. टेंकडीवरच्या टेहळ्यांना तें लष्कर दिसूं लागलें आहे यावरून तोच अदमास खरासा वाटतो.

**शहाजीः—**अघाडीस जगदेवराव वाट अडवून बसला आहे, आणि मागून इसामिय्या आणि लुखजी जाधवराव येताहेत! मिळून आम्हांला कोंडून कैद करण्याची मसलत! ही चतुराई मोंगल सरदारांची दिसत नाहीं. लुखजी जाधवरावा-

सारख्या अनुभवी मराठी सेनापतीची अक्कल इथे खर्च झालेली उघड दिसते आहे ! ( आकाशाकडे पाहून ) मामासाहेब ! मोंगलांनीं आमचा पाठलाग केला त्यांत जर तुम्हीं त्यांना साहाय्य केलें नसतें, आणि या जंगलांतल्या आडवाटा त्यांना दाखवून दिल्या नसत्या, तर अशा बिनतोड रीतीनें आम्हांवर छापा आणण्याची एकट्या मोंगलांची काय मगदूर होती ? आमचेच लोक आम्हांला वैरी ! घरभेद्यांशीं गांठ पडली म्हणजे कठिण प्रसंग ओढवतो म्हणतात तो हा असा ! एकट्या जगदेवाला मी जुमानीत नव्हतों, पण मागून लुखजीनें पिछाडीवर येऊन चांगलेंच वैर उगवलें ! त्यांतून मी मोकळा असतों तर पराक्रमाच्या जोरावर बचावाचा कांहीं तरी मार्ग काढतां आला असता. पण राणीसाहेब, या अकल्पित प्रकारानें तुमच्या शरीराला स्तब्धता आल्यामुळें माझी अक्कल गुंग होऊन गेली ! आतां धर्मपत्नीला संभाळूं कीं अन्नदात्या धन्याला संभाळूं ? पत्नीही अशी तशी नव्हे ! प्रत्यक्ष महाराष्ट्राच्या छत्रपतीला जन्म देणारी महापतिव्रता धर्मपत्नी ! तो अन्नदाताही असा तसा नव्हे ! माझ्यावांचून ज्याला दुसरा आधार नाहीं, आणि ज्यानें विश्वासानें माझ्या मांडीवर मान ठेवलेली आहे, असा तो माझा अन्नदाता सुलतान ! जिला अग्निब्राह्मणांसमोर जन्मभर सोबत देण्याचें वचन दिलें तिची सोबत कायमची तोडूं, कीं भोंसल्यांच्या वंशांतला होईन तरच तुझा बचाव करीन असें घटकेपूर्वी ज्याला वचन दिलें त्या सुलतानाला दगा देऊं ? परमेश्वरा ! या दोन कर्तव्यांच्या कात्रींत अडकलेला माझा जीव एकीकडे पत्नीच्या ममतेमुळें तळमळतो आहे, तर दुसरीकडे निमकहरामीच्या दुर्लौकिकाला थरकांप भितो आहे ! या दोन्ही संकटांतून मला निभावून नेणारा सुधा मार्ग असेल तर तो तुलाच ठाऊक ! मला तर तो दिसत नाहीं !

**जिजाऊः**—महाराज, माझ्यासाठीं आपण कष्टी होऊं नये, आणि काळजींत पडूं नये. मला इथेच सोडून आपण खुशाल निघून जावें. हा दुर्धर प्रसंग आपल्या कर्तृत्वाची परीक्षा पहात आहे. अनेक शतकेंपर्यंत महाराष्ट्राच्या पायांत पारतंत्र्याची जी शृंखला जखडली गेली आहे ती तुटावी कीं न तुटावी, परकीयांच्या गुलामगिरींत त्यानें यापुढचें आयुष्य कंठावें कीं न कंठावें, याचा निकाल आजच्या संग्रामावरून लागणार आहे. आजच्या संग्रामांत आपण यशस्वी होऊन शत्रूच्या गराड्यांतून पार झालांत म्हणजे त्यांतच हा महाराष्ट्रदेश विपन्नावस्थेंतून पार झाला असें होत आहे. याकरतां क्षणाचाही विलंब न करतां आपण आघाडीस लढाई चालली आहे तेथें जावें.

**शहाजीः**—कसा जाऊं ? मोंगल तुमच्या गर्भस्थ अर्भकाचा घात करण्यासाठीं रात्रंदिवस टपलेले आहेत हें मला ठाऊक असूनसुद्धां त्यांच्या हातीं मी आपण होऊन तुम्हाला कसा देऊं ? अनेक जन्मांच्या पुण्यांशेंकरून हें महाराष्ट्राचें नव-निधान आम्हांला प्राप्त होणार तोंच त्याचा अव्हेर मी जाणून बुजून केला तर जन-विश्व मला काय म्हणेल ? आणि या हतभागी फलत्यागी जीविताचा भार तरी मला कसा सहन करवेल !

**जिजाऊः**—महाराज, स्वामी काय म्हणाले आहेत तें स्मरतें ना ? तुम्हांला पुत्र होईल आणि तो छत्रपति होईल असें स्वामीनीं प्रत्यक्ष कंठरवानें सांगितलें असतां त्याचा अविश्वास आपल्या मनांत उद्भवतो तरी कसा ! असा अविश्वास मानण्यांत साधूंची अवज्ञा होते, देवतेचा क्षोभ होतो, हें मीं आपणांस सुचवायला पाहिजे असें नाहीं ! आम्हांवर आजपर्यंत किती संकटें आलीं व त्यांचा परिहार कसा होत गेला, हें लक्ष्यांत आणावें. हीं संकटें यदृच्छेनें टळलेलीं नाहींत अथवा केवळ आमच्याच कर्तृत्वाच्या बळावर त्यांचा परिहार झालेला नाहीं ! तुळजा-भवानीच्या दयामृताचा वर्षाव आम्हांवर होत आहे त्यामुळेंच विघ्नांचा वणवा जेथें तेथें आपोआप शांत होत आहे ! मागच्या संकटांप्रमाणें याही संकटांतून तुळजामाता आम्हांला पार करील यांत संदेहच नाहीं. मात्र आम्ही आपल्या कर्तव्याला जागलें पाहिजे.

**शहाजीः**—राणीसाहेब, स्वामींच्या वचनाचा तुम्ही निर्वाळा देतां तो मी शिरसा मान्य करतों आणि असेंच समजतों कीं, आमचा पुत्र सुरक्षितपणें जन्मास येऊन योग्यकाळीं सार्वभौम पदाचा अधिकारी होईल; असा स्वामीनीं आशिर्वाद दिला आहे तो खरा ठरणारच. परंतु बंदिवास, हालअपेष्टा किंबहुना प्राणहानि या विपत्ति तुम्हांवर न ओढवाव्या असा कांहीं स्वामींच्या आशीर्वादानें बंदोबस्त झालेला नाहीं ! तुम्ही येथून हाललां नाहीं आणि तुम्हांला टाकून मी आघाडीस निघून गेलों तर तुम्हांवर आतां सांगितलेलीं संकटें गुदरण्याचा हटकून संभव आहे. आम्ही आपल्या कर्तव्याला जागलें पाहिजे असें तुम्हींच मघाशीं म्हणालांत, तर मीच तुम्हांला विचारतों कीं, पत्नीवर आलेल्या प्राणसंकटाचें निवारण करणें हें पतीचें आद्यकर्तव्य नव्हे काय ?

**जिजाऊः**—माझें रक्षण करणें हें आपलें यावेळचें मुळीं कर्तव्यच नव्हे. माझ्या मोहाला गुंतून आपण इथेच कालक्षेप कराल तर त्यांत माझा आपला,

अथवा कुणाचाच बचाव व्हायचा नाहीं! आपण सेनानायक यावेळीं सैन्याच्या अग्रभागींच असलें पाहिजे. तसें न घडेल तर शत्रु दोन्हीकडून मारा करून सारीच फौज बुडवून टाकील! आपला एक एक क्षण लाख रुपयांचा जात आहे याचा विचार करा. आपण मनाचा हिय्या करून महार्णवांत लोटलेली आणि अनेक वादळांतून निभावून आणलेली ही स्वराज्याची नौका पैलतीराला पोंचण्याच्या बेतांत आली असतां आयत्या वेळीं मनाची चलबिचल करून घेऊन आपण तिला बुडवणार कीं काय? विवेकसिंधूचा पोंहणारा शेवटीं स्त्रीमोहानें मूढ होऊन क्षुद्र ममतेच्या गोष्पदांत बुडाला, असा दुर्लौकिक आपण करून घेऊं नये हीच मी हात जोडून प्रार्थना करतें. मोंगलांच्या बंदिवासांत मी सांपडलें तर माझें काय होईल ही चिंता आपण वाहतां, पण ती चिंता माझ्या मनाला मुळींच शिवत नाहीं! मी म्हणतें माझें कांहीं होवो! छत्रपतीला मीं जन्म दिला म्हणजे माझ्या आयुष्याचें कर्तव्य संपलें! बाकी गोष्टींची कोण पंचाईत करतें?

**शहाजीः**—( किंचित् विचार करून ) तुम्ही जिवावर उदार होऊन कोणत्याही संकटाला तोंड द्यायला तयार झालां आहां हा तुमच्या मनाचा थोरपणा अलौकिक आहे. तरी पण या स्थितींत तुम्हांला इथे असेंच सोडून जाण्याचें धैर्य मला होत नांहीं. बरे, आतां तुमच्या जिवाला कांहीं आराम वाटतो आहे कीं पूर्वीचीच स्थिति कायम आहे?

**जिजाऊः**—नाही. मघांपेक्षां पोटांतली खळबळ आतां स्थिरावत चालली आहे आणि जिवाला थोडें बरें वाटतें आहे.

**शहाजीः**—सड्या स्वारींत आमच्याबरोबर दौड करणें तुमच्यानें होणार नाहीं, पण पालखींतून जाणें तरी तुमच्यानें निभेल कीं नाहीं?

**जिजाऊः**—आणखी थोडी विश्रांति मिळाल्यावर हळू हळू पालखी चालली तर तींत बसून जाण्याइतकें सामर्थ्य मला येईल ही खात्री वाटते.

**शहाजीः**—आणि तुमचा हुरूप पाहून सांप्रतच्या संकटांतून तुम्हांला मुक्त करण्याची मलाही खात्री वाटते! एका घटकेनें कां होईना, पण तो पलीकडे शिवनेरीचा किल्ला दिसतो आहे तेथपर्यंत तरी पालखींतून हळू हळू पल्ला गांठणें तुमच्यानें होईल कीं नाहीं?

**जिजाऊः**—(स्वगत) यांनीं आपण होऊनच ही तोड काढली हें उत्तम झालें. आतां नुसता होकार दिला म्हणजे हे इथून जातील आणि मी मनांत घोळतें आहें तो बेत कितपत तडीला जातो हें पहायला बरें पडेल. (हर्षाचा आविर्भाव दाखवून उघड) ही शिवनेरीस जाण्याची तोड आपण काढली ही मला फार पसंत आहे. पालखींत बसून तेथपर्यंत जाणें मला निभावेल. त्याची नको काळजी.

**शहाजीः**—(रायबाकडे वळून) रायभान नाईक! राणीसाहेबांची ही अशी अवस्था आणि मागून शत्रूचें लष्कर येत असल्यामुळें इथे थांबण्याची तर सोय नाहीं. सबब राणीसाहेबांनीं हा नजीकचा शिवनेरीचा किल्ला आहे याच्या आसऱ्याला जाण्याचा बेत योजला आहे. या प्रदेशांतले आडरस्ते, वळणें, दऱ्या खोरीं तुम्हांला सर्व माहीत आहेत. भावी छत्रपतीच्या नांवानें उभारलेलें दोनशें पायदळाचें पथक राणी-साहेबांच्या तैनातीस दिलें आहे त्याचे तुम्ही सरदार आहां. राणीसाहेबांना मी तुमच्या हवालीं करीत आहें, त्यांच्या हालचालींचा शत्रूला मागमूस लागतां कामा नये आणि आडवाटांनीं सुरक्षितपणें यांना किल्ल्यावर पोंचवलें पाहिजे. सांगा, हें बिकट काम पार पाडणें तुमच्यानें होईल कीं नाहीं?

**रायबाः**—महाराज, मला नसतें महत्त्व देऊन यावेळीं असा उसनेपणाचा प्रश्न आपण विचारावा याचें नवल वाटतें. आम्ही छत्रपतींच्या पथकाचे शिपाई म्हणवतों त्याअर्थीं छत्रपतींचा बचाव करणें—सांप्रत छत्रपति ज्यांच्या उदरांत आहेत त्या या आमच्या धनीनबाईंचा बचाव करणें हें आमचें कामच आहे, आणि हें बजाव-ण्यांत वेळ पडेल तर आम्ही प्राणांचेसुद्धां बळी द्यायला तयार आहों; हें आपण पक्कें समजून निर्धास्त असावें, आणि अघाडी संभाळण्यासाठीं याच पायीं निघून जावें.

**जिजाऊः**—खरें बोललास रायबा! महाराज, आपण निश्चिंतपणानें जावें.

**शहाजीः**—उत्तम आहे. हा मी चाललोंच. रायबा, संभाळ. सर्व भिस्त तुझ्यावर टाकली आहे. राणीसाहेब! येतों आतां. तुम्हीही इथे थांबूं नका.

**जिजाऊः**—नाहीं थांबत. आम्हीसुद्धां क्षणभरानें निघालोंच. (शहाजी जातो.) गेले इथून एकदांचे! रायबा हे इथेच उभे रहाते आणि मागून मोंगलांचें लष्कर येऊन गांठ पडली असती तर मोठेंच झूज लागलें असतें! नाहीं बरें? (खालीं बसते.)

**रायबाः**—जे आमचे महाराज शत्रूला धुंडाळीत जाऊन त्याशीं झूज घेणारे, ते प्रत्यक्ष इसामिय्याशींच गांठ पडल्यावर तुंबळ लढाई केल्याखेरीज कसे राहतील?

लढाईत आमचे महाराज नेहमीं सर्वांच्या पुढें ! जिवावर उदार होणें म्हणजे त्यांना कांहीं वाटतच नाहीं ! आजच पहामा, इतक्या जखमा लागल्या असून पुनः आणखी लढाईला आतुरपणानें धांवतातच आहेत !

**जिजाऊः**—लढाईच्या वेळीं अंगावर चढवायला चिलखत बरोबर घेतलेलें नाहीं कीं काय असें विचारणार होतें, पण विचारायचें राहिलें.

**रायबाः**—( हंसत ) राहिलें तेंच बरें झालें ! विचारलें असतेंत तर त्यांनीं उत्तर दिलें असतें कीं, माझा मात्र जीव, आणि माझ्या तीन हजार सोबत्यांचे जीव नव्हे-तच कीं काय ? एक चिलखत मी घालीन, पण इथे तीन हजार चिलखतें कुठचीं आणूं ? बाईसाहेब, शिपायाचा धंदा म्हटला म्हणजे हाणामारी, झगडारगडा असा हा चालायचाच ! हीं हातावर शिरें घेतलेलीं माणसें ! यांचें काय विचारतां ?

**जिजाऊः**—( खिन्नतेनें स्वगत ) वीरपत्नीचें हेंच दैन्य आणि हेंच वैभव !

**रायबाः**—बरें, बाईसाहेब ! आतां चलायचेंना इथून ? महाराज जातांना काय बोलले आहेत बरें ? आतां विश्रांति पुरे झाली. उठा आतां !

**जिजाऊः**—( स्वगत ) अघाडीला शत्रूचे हल्ले हटवून लावतां लावतां आमच्या चिमुकल्या सैन्याला पुरे पुरे झालें आहे. आणि त्यांतच आणखी इसामिय्यानें येऊन मागून लगट केली तर महाराजांवर एकदम भयंकर गर्दी होऊन वेडा वांकडा प्रसंग गुदरणार ! तो प्रसंग कसा टाळावा या फिकिरींत मघांपासून मी पडलें आहे; आणि इथून निघण्याबद्दल या रायबाचा तर सक्तीचा तगादा ! काय करावें ? ( उघड ) इथून निघायचें म्हणतोस ना ? उठतें बरें ! जाग्यावरून हालायाचें मोठें संकट वाटतें आहे; पण गेलें हें पाहिजेच ! काय करायचें ?

**रायबाः**—( स्वगत ) बाईसाहेबांची कांहीं मनापासून जाण्याची त्वरा दिसत नाहीं. हें असें कां बरें ?

**जिजाऊः**—पण कायरे रायबा, महाराजांची स्वारी चार कोस तरी गेली असेल. नाहीं बरें ?

**रायबाः**—चार कोस ? बाईसाहेब, दिवसभर चाल करून घोडीं, माणसें थक-लेलीं; त्यांतून लढाई करीत जायचें, मग चार कोस जाणार कुठून ? फार झालें तर गेले असतील कोसभर !

**जिजाऊः**—( निराशेनें ) सारी एकच कोसाची मजल म्हणतोस? संध्याकाळ तर होत चालली. अंधार पडण्यापूर्वी स्वारी शत्रूच्या फौजेंतून पार झाली असती आणि कुठे आसऱ्याच्या जागयाला गेली असती तर बरें झालें असतें. आज पावसाचें चिन्ह दिसतें आहे, आभाळ अगदीं भरून आलें आहे, म्हणून म्हणतें.

**रायबाः**—आणि म्हणूनच मीही म्हणतों कीं, आतां लवकर चालूं लागलें पाहिजे. तुम्ही पालखींत बसा. आतां क्षणभर इथे राहिलों तर धोका येईल आणि त्यांतून तुम्हांला बचावण्यासाठीं या तुमच्या गरीब रायबाला मरावें लागेल!

**जिजाऊः**—अरे, मागून मोंगलांचें लष्कर येतें येतें म्हणतात तें आहे कुठे? अजून कसें उगवत नाहीं तें!

**रायबाः**—( स्वगत ) बाईच्या मनांत काय आलें आहे न कळे! ( उघड ) कशाला उगवायला पांहिजे? नाहीं उगवलें ती बरी टळली पीडा! पावसाच्या भीतीनें पाठलागाचा नाद सोडून त्यानें मुक्काम केला असेल कुठे तरी! उठा आतां लवकर!

**जिजाऊः**—अजून शत्रू कुठे उमटत नाहीं तेव्हां तूं म्हणतोस तेंच खरें! चला. जाऊं या आतां. ( कांहीं पावलें चालून कानोसा घेते. ) अरे पण रायबा, ऐक! ऐक! हा नगाऱ्याचा आवाज कोणीकडून येतो आहे रे? हे कुणाच्या फौजेचे नगारे वाजतात बरें? ( एक टेहळ्या धांवत येतो. )

**टेहळ्याः**—बाईसाहेब, घात झाला! आधीं लवकर दृष्टीआड व्हा. कसेंही करून त्या टेंकडाच्या पलीकडच्या जंगलांत शिरा. इसामिय्याची स्वारी वाऱ्याच्या वेगानें चाल करून येते आहे. हे नगाऱ्याचे शब्द—हीं शिंगें वाजतात—हा माणसांचा कलकलाट ऐकूं येऊं लागला. पळा! पळा लवकर! ( जातो. )

**रायबाः**—( त्रासून स्वगत ) ज्याला भीत होतों तें शेवटीं या बाईनें घडवून आणलेंच म्हणा!

**जिजाऊः**—रायबा, कायरे हा टेहळ्या म्हणतो?

**रायबाः**—हा म्हणतो कीं लवकर पळा, नाहीं तर प्राणाला मुकाल.

**जिजाऊः**—आणि तूं काय म्हणतोस?

**रायबाः**—मी लवकर निघा म्हणतों इतकेंच नाहीं, तर आतां तुम्हांला उचलून पालखींत बसवावें म्हणतों!

**जिजाऊ:**—( तिरस्कारानें ) टेहळ्या मूर्ख आणि तूं सातमूर्ख ! ( वीरश्रीनें ) रायबा ! मोंगलांच्या सैन्याशीं ही पहिलीच गांठ पडली असतां तुझ्या हातीं असलेलें हें छत्रपतीचें निशाण मागें परतेल तर स्वराज्याच्या स्थापनेला केवढा मोठा अपशकुन होईल बरें ? युद्धाचा समय प्राप्त झाला असतां पलायन करून प्राण वांचवावा ही भावना क्षात्रधर्माला विरुद्ध असल्यामुळें क्षत्रियकुलावतंस छत्रपति माझ्या उदरांत नांदत आहे त्याला ती बिलकुल मानवत नाहीं ! मोंगलांच्या नगाऱ्याची गगनभेदी गर्जना ऐकतांच अपार शौर्याची स्फूर्ति पावणारा माझा गर्भ जोरजोरानें उसळ्या घेत आहे ! छे छे ! आतां इथून हालायचें माझ्या स्वाधीनचें नाहीं. पळून गेलें तर जीव बचावतो असेंही नाहीं. आम्ही दोनशें आहों, शत्रू दहा हजार असतील, वीस हजार असतील ! असोत बिचारे ! त्यांवर आम्हांला जय थोडाच मिळवायचा आहे ! तरी पण एवढ्याही प्रचंड सैन्याशीं दिवस मावळे तों झूज देऊन त्याला थोपवून धरण्याचें यश जर या पहिल्याच लढाईत छत्रपतीच्या तरवारीला आलें तर आमची दिगंत कीर्ति होईल. अशी लढाई आम्हाला करतां आली तर महाराज आणि सुलतान यांचा पाठलाग रहित होऊन त्यांना निसटून जायला फुरसत मिळेल. दिवस मावळल्यावर आम्ही जगलों वांचलोंच तर काळोखांतून शिवनेरीस जातांना आमच्या पाठीवर कोण येणार आहे ?

**रायबा:**—बाईसाहेब, मी भित्रेपणानें विचारतों असें समजूं नका. मोठ्या रणधुरंधर योद्ध्याला जें साहस करायचें स्वप्नांत सुद्धां येणार नाहीं तें साहस तुम्हीं करीत आहां, आणि हा लढाईचा बेत अकल्पित ठरवीत आहां. हाच मनसबा पक्का ठरला ना ?

**जिजाऊ:**—अरे ठरला म्हणजे ? दुसरा मनसबाच नाहीं, तिथे ठरला हें काय विचारतोस ? मोंगल इतके जवळ येऊन भिडले त्याअर्थी निसटून जाणें आमच्यानें होत नाहीं. शरण आम्हाला जायचें नाहीं. मग लढाईखेरीज दुसरा कोणता उपाय राहिला हें तूंच सांग बरें ? जा, छत्रपतीच्या पथकांतल्या लोकांना माझा निरोप कळव कीं, या ऐन संकटाच्या वेळीं तुमची धनीन आणि तुमचा छत्रपति स्वामिकार्याकरतां प्राण देण्याविषयीं तुम्हाला आज्ञा करीत आहे. तर या पथकाच्या नांवाला साजेल असा पराक्रम करून शूर मराठ्यांप्रमाणें मारतां मारतां मरूं या ! ( रायबा जातो व थोड्या वेळानें परत येतो. )

**रायबाः**—राणीसाहेब, आपली आज्ञा माझ्या लोकांनीं मोठ्या उत्साहानें आणि ईर्षेनें मान्य केली आहे. माऱ्याच्या ज्या ज्या जागा मी त्यांना दाखवून दिल्या आहेत, त्या जागा तुमचा हुकूम होईपर्यंत ते कधीं सोडायचे नाहींत ही खात्री असूं द्या. आणि माझ्याबद्दल म्हणाल तर तुम्हाला एकच सांगतों कीं, जेथपर्यंत या रायबाच्या कुडींत प्राण आहे तेथपर्यंत हें छत्रपतीचें निशाण या लढाईतून मागें परतायचें नाहीं. ( पडद्यांत " हरहर महादेव " असा शब्द होतो. ) ऐका ही माझ्या वीरांची गर्जना !

**जिजाऊः**—शाबास ! शाबास ! महाराष्ट्राच्या धर्मवीरानों ! ही इसामिय्याच्या फौजेची अघाडी आली ! घ्या घ्या देवाचें नांव आणि द्या शत्रूला सलामी !

**रायबाः**—आला ! आला दुस्मान ! आणखी पुढें आला ! येऊं द्या. धीरे धीरे लढाई करा. घाबरूं नका.

**जिजाऊः**—थांब. थांब रायबा ! अरे, कोणी माझी तीरकमान आणा ! आणा लौकर ! ( नोकर तीरकमान आणून देतो. ) रायबा ! पहा पहा ! अघाडीला मोंगल फौजेंतला निशाणाचा हत्ती चालतो आहे तो तीर मारून कसा मागें फिरवतें ! पहा ! ( तीर मारते. )

**रायबाः**—( हर्षानें ) वाहवा ! वाहवा ! बाईसाहेब ! नेमका गंडस्थळावर तीर लागल्यामुळें हत्ती मागें फिरला आणि त्याबरोबरच शत्रूची फौजही मागें हटून पळूं लागली. संपली लढाई ! झालें काम !

**जिजाऊः**—एवढ्यानेंच कशी लढाई संपेल ? अरे निशाण मागें फिरलें म्हणजे पळूं लागणारी फौज मोंगलांची. पण मराठी फौज एवढ्या तेवढ्यानें पळणारी नव्हे ! ते पहा जाधवराव सांवरासांवर करून पुन्हां चाल करून आले ! या खेपेला त्यांच्या चढाईचा वेग आणि आवेश विलक्षण दिसतो. सावध ! सावध ! तुमच्या बंदुका आणि कमानी हुशारीनें चालवा ! एकही गोळी किंवा तीर फुकट जातां कामा नये. भले लोकहो ! वेळ ओळखा आणि स्वतःला ओळखा !

**रायबाः**—बाईसाहेब, तो पहा, या खेपेस अघाडीपुढें उभा असलेला तो मोंगल फौजेचा मुख्य सरदार दिसतो. तो पुन्हा पुन्हा बंदूक रोखून तुम्हांवर गोळ्या घालतो आहे.

**जिजाऊः**—आणि त्याच्या गोळ्या माझ्या भोंवतीं झाडांना आणि खडकांना आपटताहेत हेंही तूं पहातोसच !

**रायबाः**—छे छे ! हें नाहीं उपयोगीं ! तुम्ही या खडकाच्या आडोशाला बसून तिरंदाजी करा. ऐका माझें एवढें. पदर पसरतों मी !

**जिजाऊः**—मी माझ्या लोकांच्या नजरेसमोरून हालले नाहीं तोंपर्यंत लढाई अशीच चालेल. हालले तर माझें कांहीं बरें वाईट झालें असें समजून लोक गोंध- ळतील आणि दगा होईल. मी नाहीं माझी जागा सोडायची.

**रायबाः**—नाहीं तुम्ही ऐकत ? तुमच्या पोटांत आमचा बाळराजा आहे त्याचा घात होईल अथवा तुमचा प्राण जाईल या भयाला तुम्ही जुमानीत नाहीं ?

**जिजाऊः**—माझ्या साहसामुळें महाराजांच्या जिवाचा जर बचाव होतो आहे, तर मी कोणत्याही भयाला जुमानणार नाहीं.

**रायबाः**—ठीक आहे. तुम्ही जागा सोडीत नाहीं तर नका सोडूं ! माझ्या शरीराची ढाल करून तुम्हापुढें मी उभा राहतों. तुम्ही जागा सोडा अगर सोडूं नका. हें छत्रपतीचें निशाण कांहीं याउप्पर इथून हालायचें नाहीं. ( जिजाऊपुढें उभा राहतो तोंच गोळी लागून खालीं पडतो. )

**जिजाऊः**—( गहिवरून ) अरेरे ! रायबा, आपल्या प्राणाचा बळी देऊन तूं स्वामिभक्तीचें सार्थक केलेंस ! आतां कस्चा वांचतोस तूं !

**रायबाः**—बाईसाहेब, मरणाचें नाहीं मला दुःख वाटत ! पण हें बालछत्र- पतीचें निशाण पहिल्यान्दांच उभारलें नाहीं, तोंच शत्रूच्या हातीं जाणार यामुळें माझा जीव तळमळ करतो.

**जिजाऊः**—तर मग ही पहा, ती तुझी तळमळ मी आतांच नाहींशी करतें. ( बर्चीचें निशाण काढून आपल्या अंगाभोंवतीं लपेटते आणि त्यावरून पदर घट्ट बांधून घेते. ) आतां नाहीं ना निशाण शत्रूच्या हातीं जायचें ? छत्रपतीचें निशाण छत्रपतीपुढें असावें तसें तें असून शिवाय शत्रूला तर दिसायचें नाहीं हें निराळेंच ! आतां होईल कीं नाहीं तुझें समाधान ?

**रायबाः**—होय होय. आतां माझा प्राण जाईल तरी सुखानें जावो ! स्वामि- कार्यावर—आणि त्यांतून पुन्हा भर लढाईत शत्रूला पाठ न दाखवतां लढतां लढतां माझा प्राण जातो, यानें स्वर्गाचीं द्वारें मला मोकळीं झालीं. यापेक्षां योद्धयानें दुसरा कोणता पुरुषार्थ साधायचा आहे ? आतां मी हात जोडून तुम्हांला शेवटचें मागणें

मागतों तें एवढेंच कीं, अजून तरी कुठे झाडाच्या अथवा जाळीच्या आडोशाला दडून आपला प्राण वांचवा. शत्रु जवळ येतांना दिसताहेत. हे चांडाळ तुमची विटंबना केल्याशिवाय रहायचे नाहींत. किंबहुना तुमचा जीव देखील घ्यायला हे लोक सोडायचे नाहींत ! मागें जाधवरावानें तुमचा छळ केला तेव्हां या रायबानें तुम्हांला सोडवलें. या खेपेला तो बिचारा रायबा जिवंत रहात नाहीं इथे त्याचा उपाय नाहीं !

**जिजाऊः**—रायबा, तुला असाच टाकून मी कशीरे जाऊं ! छत्रपतीच्या पथकापैकीं जे कोणी भले लोक अजून जिवंत राहिले असतील त्यांनीं आसपासच्या जंगलांत या रायबाला उचलून न्यावें आणि आपला जीव वांचवावा ! जा. जा. शूर शिपायांनो, माझ्या बचावाकरितां आतां तुम्हीं कोणतीही मर्दुमी करायची ठेवली नाहीं. स्वामिकार्याच्या जामीनगतींतून मी तुम्हाला आनंदानें मोकळें करतें. ( मागें वळून ) काय ? कोणीच दिसत नाहींत ! कोणीच जिवंत राहिले नाहींत ! हाय हाय ! सारें पथकचें पथक जमीनदोस्त झालें आं ! आतां मी कोणीकडे जाणार आणि कितीशी लांब जाणार ? शत्रूकडून उगीच विटंबना करून घ्यावी त्यापेक्षां काय सोक्षमोक्ष व्हायचा तो होऊं दे इथेच ! ( इसामिय्या व मागून कित्येक मराठे शिलेदार धांवत येतात. )

**इसा०ः**—( त्वेषानें जिजाऊकडे बोट दाखवून ) या या कजाग बायकोनें नेमका तीर मारून बादशाही फौजेच्या निशाणाचा हत्ती मागें फिरवला ! ( जाधवराव म्यानांतून तरवार उपशीत येतो. )

**जाधव०ः**—( क्रोधानें ) कुणी बादशाही निशाण मागें परतवलें ? बादशाही फौजेचा असा भयंकर अपमान करणारा कोण हा दुर्दैवी घमेंडखोर ? शहाजी भोसला ? अथवा त्याचा सोबती रणदुल्लाखान कीं मुरार जगदेव ? या दक्षिणेंत असा कोण सरदार मातला आहे, कीं ज्यानें या जाधवरावाच्या दुर्निवार खड्गधारेलाही वचकूंच नये !

**इसा०ः**—राजेसाहेब, मोठ्या शरमेची गोष्ट आहे कीं, या प्रसंगीं बादशाही फौजेचा अपमान करणारा कोणी सरदार नसून ती एक औरत आहे !

**जाधव०ः**—( तरवार म्यानांत घालीत आश्चर्यानें ) औरत आहे ! तसें असेल तर तिथे या जाधवरावाची दुर्निवार खड्गधाराही कुंठित होय ! खरेंच तुम्ही

म्हणतां त्याप्रमाणें ही मोठ्या शरमेची आणि आश्चर्याची गोष्ट! पण बादशाही फौजेचा मोहरा मुरडून तिला पळवून लावण्याचा पराक्रम एखाद्या स्त्रीच्या हातून घडला असेल हें मला खरें वाटत नाहीं.

**इसा०:**—( रागानें ) खरें वाटत नसेल तर या आणि पहा ! ती औरत इथेच उभी आहे. तुमच्या जातीचीच आहे. पहा तुमच्या ओळखीची असेल तर !

**जाधव०:**—( जिजाऊजवळ येऊन हर्षानें ) ही तर माझी मुलगी जिजाबाई ! मोंगलाई फौज मागें हटवून लावण्याची अजब करामत माझ्या जिजीनें केली म्हणतां ?

**इसा०:**—( दांतओंठ खात पाय आपटीत ) होय होय ! तुमच्या–तुमच्या जिजीनें बरें ! शहाजी भोंसल्याच्या बायकोनें !

**जिजाऊ:**--( धिक्कारानें ) तुरुकड्या ! आतां पाय आपटून दांत ओंठ चावून काय करतोस? शहाजीराजांना जिंकायचा पण भोगून मोठ्या दिमाखानें डंका वाजवीत, निशाणें फडकावीत दिल्लीहून आलास, पण शहाजीराजांची आणि तुझी गांठ पडण्याआधींच मी त्यांच्या स्त्रीनें आज दोनशें पायदळाच्या बळावर तुझ्या दहा हजार फौजेची दाणादाण करून तिला चार घटका थांबवून धरलें ही माझी कीर्ति आतां अजरामर होईल !

**जाधव०:**—( स्वगत ) शाबास ! शाबास ! जिजी ! अंगांत बाणलेलें जाधव-रावांचें शौर्य प्रकट करून आज धन्य झालीस आणि मलाही धन्य केलेंस !

**जिजाऊ:**—अधमा ! तुम्हां मोंगल लोकांचा नक्षा उतरून आज मी तुमचीं तोंडें काळीं ठिक्कर पाडलीं आहेत ! याउप्पर जिथे जिथे शिपाईगिरीच्या गोष्टी निघतील तिथे तिथे तुम्हीं शरमेनें खालीं मान घालून चूप राहिलें पाहिजे !

**इसा०:**—ऐका. ऐका. या तुमच्या मुलीचीं अजूनसुद्धां कशीं कशीं बेफाम-पणाचीं बोलणीं चालताहेत तीं ! राजेसाहेब, करा, इचें काय वाटेल तें करा. तुम्ही तिचे बाप आहां. ती तुमची मुलगी आहे. इच्या वागणुकीचा काय तो वाजवी इनसाफ तुमचा तुम्हीच करा !

**जाधव०:**—( गहिंवरून ) ये ये ! वीरकन्ये ! आजपर्यंत तुझा छळ करून आतां पस्ताव्यांत पडलेला तुझा बाप तुला प्रेमानें बोलावतो आहे त्याला भेट दे ! ( जिजाऊ व जाधवराव भेटतात. )

**इसा०**:—( त्वेषानें उसळून ) राजाजी ! हे काय करतां ? जिच्या हट्टी लढाऊ-पणामुळें बादशाही फौजेचीं पांच चारशें नामी माणसें प्राणाला मुकलीं, ती ही गुन्हेगार औरत हत्तीच्या पायाखालीं घालून मारून टाकण्याच्या लायकीची असतां तिला तुम्ही उराशीं कवटाळून धरतां म्हणजे काय गोष्ट आहे !

**जाधव०**:—माफ करा, माफ करा. मी चुकत असेन तर माफ करा ! मिय्यासाहेब, मी हाडाचा खरा शिपाई आहें आणि या मुलीचा बाप आहें हें विसरूं नका ! सद्गुणांचा गौरव करणें हें सामान्य माणुसकीचें लक्षण असतां मी अशा अद्वितीय पराक्रमाबद्दल प्रत्यक्ष माझ्या मुलीचा गौरव केल्याखेरीज कसा राहीन ?

**इसा०**:—जाधवराव ! बेहोष झालांत ! कुणीकडे भटकत चाललांत ? कुठे आहां तुम्ही ? धन्याशीं कपट करून जांवयाला आणि मुलीला संभाळून घ्यावें असें जरी तुमच्या मनांत आलें असलें तरी बादशहानीं तुमच्या गळ्यांत ढाली बांधली आहे तिची कांहीं तरी शरम राखा ! जर तुम्हीच अशी उघडपणानें फितुराची चाल धरलीत तर याच क्षणीं लष्करांत बंड उत्पन्न होऊन तुमचे मराठे आणि माझे मोंगल यांमध्यें जंग सुरू होईल, त्याचा परिणाम तुम्हीं काय पाहिला आहे ? तुमचा नेकीचा लौकिक, तुमची जहागीर आणि पुढें मिळणारी निजामशाही राज्याची कुलमुकत्यारी हें सर्व मातींत घालायला तुम्ही तयार झालां कीं काय ? ध्यानांत धरा कीं मुलीचें संकट तुम्ही स्वतःवर ओढून घेतल्यानें तिचा तर बचाव होणारच नाहीं. तुम्हीं मात्र धुळीला मिळाल !

**जाधव०**:—( खिन्नतेनें जिजाऊस दूर सारून ) जिजी, तुझा नवरा तुला इथेंच टाकून गेला हें घडलें तरी कसें ?

**जिजाऊ**:—बाबा, ज्यांना तुम्हीं मला जन्माचे सोबती नेमून दिलेंत ते वीर-शिरोमणि मला जंगलांत टाकून जीव बचावण्यासाठीं पुढें निघून गेले असतील असली दुष्ट कल्पना तुमच्या मनांत कशी आली ? त्यांच्या स्वारीबरोबर धांवणें माझ्यानें निभेना म्हणून त्यांनीं मला शिवनेरीस जाण्याची आज्ञा केली होती.

**जाधव०**:—मग बादशाही फौजेशीं लढाई मारण्याचें धारिष्ट करून मुद्दाम स्वतःला संकटांत पाडून घेण्याचें तुला काय कारण होतें ?

**जिजाऊ**:—जे माझ्या प्राणांचे स्वामी, त्यांच्या प्राणांचा बचाव व्हावा म्हणून स्वतःचे प्राण धोक्यांत घालण्याचें धारिष्ट मी केलें. पतिव्रतेच्या चारित्र्यानें सासर-

माहेरच्या बेचाळीस कुळ्यांचा उद्धार होतो या बुद्धीनें हें धारिष्ट मीं केलें. माझें कर्तव्य म्हणून हें धारिष्ट मीं केलें आहे. याबद्दल तुम्ही मला या तुर्कांच्या हवालीं करणार कीं काय? ( जाधवराव खालीं मान घालतो. ) बाबा, खालीं मान कां घालतां? माझें वर्तन असें नाहीं कीं ज्यामुळें तुम्हीं लज्जेनें अधोवदन व्हावें!

**जाधव०**:—( स्वगत ) जिजी! तुला काय उत्तर देऊं? अशी तूं सद्‌गुणांची पुतळी! आणि तुझा बाप म्हणवणारा मी चांडाळ आज तुझी दैना घडवून आणणारना? भोंसल्यांच्या द्वेषाला बळी पडून मीं मूर्खपणानें या तुर्कांला भलतीच शपथ दिली आणि तुझा गळा कापला! आज हा अधम इसामिय्या माझ्या देखत तुला कैद करणार, यापेक्षां मला मरण आलेलें बरें!

**जिजाऊ**:—समजलें! ज्यापेक्षां तुम्ही वर मान करून या तुर्कांला स्वच्छ उत्तर देत नाहीं, त्यापेक्षां मला वांचवणें तुमच्या हातांतलें नाहीं हीच गोष्ट खरी!

**जाधव०**:—मिय्याजी, नवऱ्याला पळून जायला वेळ सांपडावा म्हणून मी लढाई करून तुम्हांला अडकवून धरलें असें हीच सांगते आहे तर आतां इथे हुजत घालीत बसून आम्हीं हिच्या नवऱ्याला आणखी वेळ कां मिळवून द्यावा? आतां ही कुठे जात नाहीं, येत नाहीं. हिला इथेच टाकून शहाजी पळतो आहे त्याच्या पाठीस आपण लागूं या.

**इसा०**:—( रागानें ) फार चांगलें सांगतां! हातचें सोडा आणि पळत्याच्या पाठीस लागा! मी तुम्हांला बजावून सांगतों कीं, हिला कैद केल्याखेरीज मी इथून हालणार नाहीं आणि या कामांत तुमची रदबदली साफ ऐकणार नाहीं. कमालखान! पकड हिला! ( कमालखान येतो. )

**जाधव०**:—( त्वेषानें तरवारीस हात घालीत स्वगत ) जळो माझी शपथ! जिजीला हात तर लावूं देत म्हणजे यांचीं डोचकींच उडवतों!

**इसा०**:—काय रे कमाल? कुणाचीं तोंडें पहातो आहेस? हिला पकड म्हणतों ना?

**कमाल०**:—लढाऊ औरतां देखकर मेरा दिल बहुत डरता है. मै इसकू नही पकडूंगा!

**इसा०**—अच्छा! कुच पर्वा नहीं! इसकू मै पकडूंगा! ( जिजाऊचा हात धरायला पुढें सरसावतो. )

**रायबाः**—( त्वेषानें धडपडत उठून ) मर! मर तुरुकड्या! ( इसामिय्यास निशाणाची बर्ची भोसकतो व घेरी येऊन पडतो. )

**इसा०ः**—आहा! ए क्या दगा है? दखनी काफीर बडे दगलबाज बेइमान! मुर्दे होकर भी लडते है! ( मागें सरकतो व पडूं लागतो तों कमालखान त्यास सांवरतो. )

**जाधव०ः**—( स्वगत ) धन्य धन्य रायबा! तुझ्या पायाची धूळ मीं मस्तकावर घेतली पाहीजे.

**कमाल०ः**—मिय्याजी! जखम फार जबर झालीसें वाटतें.

**इसा०ः**—कुच ऐसी जखमकी तकलीफ तो नही है! मगर ए कोन शैतान मरकरभी फेर मारने उठा?

**कमाल०ः**—ह्याच ह्याच तो रायबा भोंसला! अगदीं माझ्या पक्क्या ओळखीचा आहे गुलाम! लफंग्या! भामटा! चोर! पळपुटा! सोंगाड्या! मिय्याजी, याचे आधीं कान कापा आणि मागून मान कापा बरें! ही त्याची मरणचिठी मीं जपून ठेवली आहे. ही बांधा आधीं त्याच्या गळ्यांत! मिय्यासाहेब, मारा याला आधीं लौकर! नाहीं तर आपोआप मरेल! फार लुच्चा आहे तो!

**इसामिय्याः**—अरे राहूं दे. आपोआप मरतो त्यावर नामर्दाप्रमाणें काय घाव घालायचा आहे? जिजाऊला पकडण्याशीं आपल्याला कारण. तिला पकडून पह्यान्यांत दिली म्हणजे भागलें काम! ( म्हाळसाबाई, बक्षी व इतर जाधव शिलेदार घाई-घाईनें येतात. )

**म्हाळसाः**—खबरदार माझ्या जिजीला कोणी हात लावील तर!

**इसा०ः**—( मागें सरकून स्वगत ) हें काय लचांड इथे नवीन उत्पन्न झालें! एवढा वेळ या म्हाताऱ्याला दबावून चुचकारून कसें तरी संभाळलें आहे. पण याची शपथ आतां या बाईपुढें लटपटणार कीं काय होणार, कांहीं कळत नाहीं!

**जाधव०ः**—( स्वगत ) प्रतिकूल भार्या हें संसारांतलें शल्य तर खरेंच, पण आज मात्र तें शल्य कल्याणदायक खास होणार!

**जिजाऊः**—आई, माझें काय होणार असेल तें होऊं दे! तूं कशाला माझ्या संकटांत स्वतःला गोंवून घेतेस?

**म्हाळसा**:—जिजी, यावेळीं तुझा बचाव मीं केला नाहीं तर दुसरें कोण करील? वाघाची जात निर्दयांतली निर्दय म्हणतात, पण वाघीणसुद्धां मरेपर्यंत आपल्या पिलांचा बचाव करीतच असते. ही झाली जनावरांची गोष्ट. मग मी तर माणूस आहें. मोंगल तुला कैद करतात हें ऐकल्यावर माझ्यानें स्वस्थ कसें रहावेल बरें? ( हळू स्वरांत ) जिजी, आतां संधि पाहून तूं इथून नाहींशी होशील तर फार बरें होईल.

**जिजाऊ**:—( आश्चर्यानें हळूच ) नाहींशीं होऊं? आणि पुढचा विचार ?

**म्हाळसा**:—पुढचा विचार मी आणि बक्षी पाहू घेतों. जा !

**जिजाऊ**:—( हळू स्वरांत ) बरें आहे. जातें.

**म्हाळसा**:—( जाधवरावास ) महाराज, जिजीला धरण्याच्या उद्योगांत पडणार नाहीं असें आपण मला वचन दिलें आहे.

**जाधव०**:—राणीसाहेब, तें वचन मीं मोडलें नाहीं आणि कधीं मोडणार नाहीं !

**म्हाळसा**:—तर मग हा गहजब तिच्यावर कोणाकडून होतो आहे !

**इसा०**:—गुन्हेगारावर गहजब सरकारचा ! राणीसाहेब, तुम्हाला एकदमच सांगून टाकतों कीं, तुमची मुलगी बादशाहाची गुन्हेगार असून ती आज माझ्या हातांत सांपडली आहे. तिला कैद करून नेल्याखेरीज मी कधीं सोडणार नाहीं. आणि या कामांत मला अडथळा करणारा माणूस आज तरी दुनयेंत हयात नाहीं ! राजेसाहेबांविषयीं तुम्हांला कांहीं भ्रम असेल तर त्यांच्यादेखत हा मी आतांच तिला पकडतों. पहा ते मला हरकत करतातसे !

**म्हाळसा**:—महाराज ! हें काय म्हणतो हा मोंगल ?

**जाधव०**:—( शरमेनें खालीं मान घालून ) तो म्हणतो तें खरें आहे. तो जर जिजीला कैद करूं लागला तर मला त्याचा हात धरतां येणार नाहीं.

**म्हाळसा**:—तर मग महाराज, वाघाच्या पंजाखालीं सांपडलेली ही अनाथ गाय कोणी सोडवायची ?

**जाधव०**:—तें माझ्या दुर्दैवाला विचारा ! मला विचारून काय उपयोग ? सारी दक्षिण पादाक्रांत करण्याची हिंमत मला आहे; पण प्रत्यक्ष माझ्या मुलीचें रक्षण करणें माझ्या हातांतलें नाहीं !

**म्हाळसाः**—हें काय असें बोलणें ? असा आपण उदासपणा धरावा याचें कारण काय ?

**जाधव०ः**—याचें कारण इसामिय्याने कावेबाजपणानें माझ्याकडून शपथ घेववली आणि पुढचा मागचा विचार न पहातां मी मूर्खपणानें ती शपथ देऊन चुकलों. ती शपथ यावेळीं मला भोंवते आहे.

**म्हाळसाः**—( रागाने ) शपथ घेऊन चुकलों ? असली कसली ही शपथ ! मोंगल मुलगी ओढूं लागले तरी सुद्धां मी कानांत तुळशीपत्रें घालून बसणार, अशी शपथ घेण्यासारखें कोणतें दुर्धर संकट तुम्हांवर कोसळलें होतें ? हेकेखोरपणानें भोसल्यांशीं वैर माजवलेंत, माजवा; त्यांवर वर्चस्व गाजवण्याच्या ईर्षेला पडलांत, ईर्षेला पडा; निजामशाही राज्याच्या लोभाला गुंतलांत, तेंही घटकाभर पुरवलें; पण आपल्या मुलीबाळी मोंगलांच्या कैदखान्यांत घालण्यापर्यंत जाधवरावांच्या दुराशेची मजल जायला नको होती महाराज !

**जाधव०ः**—( स्वगत ) बोला बोला राणीसाहेब ! आज जितकी पूजा कराल तितकी सर्व निमूटपणें मान्य करणें मला भाग आहे !

**म्हाळसाः**—ह्या मोंगल सरदाराची संगत लागल्यापासून आपल्या बुद्धीला कसा भ्रंश पडत चालला होता तें आम्ही पहात होतों. ज्या दिवशीं गंगाजळ व गीतेचें पुस्तक देवघरांतून छावणीत मागवून नेलें त्याच दिवशीं इसामिय्यानें भुरळ पाडून कांही तरी अविचाराची शपथ आपणाकडून घेववली असा आम्हीं तर्क केला होता. पण त्या शपथेचें स्वरूप इतकें हिडीस आणि भयंकर असेल हे आमच्या स्वप्नांतही नव्हतें ! असो. जी चूक होऊन गेली ती सुधारायला अजूनसुद्धां मार्ग आहे. अविवेकाच्या लहरींत घेतलेली शपथ पाळणें आपणाला भाग नाहीं. मुलीला हात लावूं देणार नाहीं असें आपण इसामिय्याला स्पष्ट सांगावें.

**इसा०ः**—राणीसाहेब, असा भलताच सल्ला कसा सांगतां ? तुमचा सल्ला ऐकून राजेसाहेबांनी दौलतीला आणि अब्रूला मुकावें म्हणतां कीं काय ?

**म्हाळसाः**—जर असल्या अधमपणानें दौलत आणि अब्रू राखावयाची असेल तर जळो ती दौलत आणि जळो ती अब्रू !

**जाधव०ः**—( उसासा टाकून ) राणीसाहेब, शपथ घेतलेली कशीही असो. ती मोडणें माझ्या हातून कधींही होणार नाहीं.

**इसा०:**—बरोबरच आहे. गीता व गंगाजळ हातांत घेऊन उच्चारलेलें वचन खोटें पाडावें आणि आपले पितर नरकांत लोटून द्यावे हें राजेसाहेबांसारख्या पुण्यवान् माणसाच्या हातून कसें घडेल ?

**म्हाळसा:**—मी प्रार्थना करतें. एवढी माझी भीड ऐकावी.

**जाधव०:**—कशी ऐकूं ? सत्य हा लुखजी जाधवरावाचा आत्मा आहे. तो गमावल्यावर या साडेतीन हातांच्या चालत्या बोलत्या मढ्यानें जगांत काय मिरवायचें आहे ?

**इसा०:**—वाहवा ! वाहवा ! थोरपणाची बला कांहीं और आहे ! राणीसाहेब, तुमच्या शास्त्रांत हरिश्चंद्राची गोष्ट सांगितली आहे ती कोणाला खोटी वाटत असेल तर हे या काळांतले हरिश्चंद्र इथे उभे आहेत यांचें लोकांनीं दर्शन घ्यावें व नमस्कार करावा ! ( नमस्कार करतो. ) आणि राणीसाहेब, आपण पतिव्रता म्हणून आपली कीर्ति दुनियेंत गाजत आहे. जी शपथ राजेसाहेबांनीं घेतली ती आपणही पाळलीच पाहिजे. तर उगीच माझ्या कामांत अडथळा करून वेळ घालवूं नका. जिजीला बऱ्या बोलानें हवालीं करा !

**म्हाळसा:**—असल्या शपथेनें मीं मुळींच बांधलेली नाहीं आणि मी साफ सांगतें कीं, प्राण गेला तरी मी मुलीला हवालीं करणार नाहीं !

**इसा०:**—बडी अफसोस्की बात है ! राजाजी, हा बखेडा घरांतल्या घरांत तुमचा तुम्हीं मिटवला पाहिजे. नाहीं तर या गोष्टी विकोपाला जातील.

**बक्षी:**—( जाधवरावास ) धनीसाहेब, जिजाताईबद्दल आपली काय आज्ञा आहे ?

**जाधव०:**—माझी आज्ञा कांहीं एक नाहीं. मी तिला धरा म्हणत नाहीं, आणि सोडाही म्हणत नाहीं !

**बक्षी:**—झालें तर ! या कामांत धनीसाहेबांचा कांहींच हुकूम होत नाहीं तर या लष्करांत धनीणबाई आम्हांला वडील असल्यामुळें त्यांचाच हुकूम आम्ही अक्षरशः पाळणार ! मिय्यासाहेब, आम्ही जाधव शिलेदार तुम्हांला साफ सांगतों कीं जिजाताईला आम्ही तुमच्या हातीं कधीं देणार नाहीं !

**इसा०:**—( रागानें ) तर काय तुम्ही बादशाहाशीं उघड उघड बंडावा करतां ?

**बक्षीः**—बंडावा आम्ही करीत नसून तुम्हीच करीत आहां. लढाईत शत्रूकडचीं बायका माणसें सांपडलीं तर लष्करांत तीं त्यांच्या त्यांच्या आप्तांच्या हवालीं करावीं असा बादशाही फौजेचा रिवाज पूर्वींपासूनचा आहे. तो रिवाज मोडून तुम्ही जिजा-ताईला आपण स्वतः कैद करून नेऊं म्हणतां, हा तुमचा बंडावा आम्ही चालूं देणार नाहीं !

**इसा०ः**—बस्स ! बस्स ! जिथे बादशाही हुकमाची पायमल्ली होईल तिथे सरकारची इज्जत राखण्यासाठीं आम्ही कोणाचाही मुलाजा न धरतां बंदोबस्त करीत असतों.

**बक्षीः**—मियाजी, ही जाधव घराण्याच्या अब्रूची गोष्ट आहे. याकरतां हा हट्ट सोडून द्या. न सोडाल तर इथे तरवार चालेल. मुडदे पडतील, खूब लक्षांत ठेवा ! ( जाधव तरवारी उपसतात. )

**इसा०ः**—( तरवार उपसून ) मला बादशाही सरदाराला भणंग मरगट्यांच्या धमकावणीचें काय भय आहे ? हा मी सर्वांदेखत जिजीला धरून मेण्यांत नेऊन कोंबतो !

**बक्षी०ः**—खबरदार ! त्या सतीच्या शरीराला जो स्पर्श करील त्याचा हात तोडला जाईल !

**जाधव०ः**—( सभोंवतीं पाहून आश्चर्यानें ) थांबा ! थांबा ! ऐका !

**इसा०ः**—( त्वेषानें ) काय ऐका ? ऐका काय ?

**जाधव०ः**—हो. हो. थांबा. थांबा. आधीं चोंहोंकडे निरखून पहा; आणि मला सांगा कीं, जिच्यासाठीं तुम्ही भांडतां ती जिजी आहे कुठे ? इथे तर ती कुठेच दिसत नाहीं !

**म्हाळसाः**—( गालांतल्या गालांत हंसत ) अगबाई ! हें काय आश्चर्य ! जिजी आत्तां इथे होती आणि इतक्यांत कुठे नाहींशी झाली ?

**बक्षीः**—मोठी अजब गोष्ट आहे ! कुणीकडे गेली असेल बुवा !

**इसा०ः**—( संतापानें उसळून ) काय चेष्टा लावल्या आहेत या ! राजाजी, जिजी जिथे दडून बसली असेल तिथून तिला आणून सरकारांत हजर करण्याबद्दल मी तुम्हांसुद्धां सर्वांना जबाबदार धरतों. आणा तिला इथे.

**बक्षीः**—जबाबदार धरा की वाटेल तें करा! इथे कांहीं ती नाहीं आणि कुणीकडे गेली तें आम्हांला मुळींच ठाऊक नाहीं.

**इसा०ः**—( स्वगत ) आतां असें बोलून पाहूं या! ( उघड ) बरें. राणीसाहेब, अहो बक्षी, तुम्हाला इतका राग येतो तर माझा आग्रह मी सोडून देतों. जिजाऊ तुम्हांजवळ असली तरी सरकारच्या कैदेंत असल्यादाखलच आहे असें मी समजतो.

**बक्षीः**—आतां तुमची समजूत बरोबर पटली हें फार चांगलें झालें. प्रथमपासूनच असे सुधेपणानें वागलां असतां तर कशाला इतका तंटा माजला असता ?

**म्हाळसाः**—हो. वाजवी गोष्टीला कोण नांवें ठेवील ?

**इसा०ः**—आतां तर तकरार नाहींना राहिली ? तर मग दाखवा जिजी कुठे दडली आहे ती ? घ्या तिला बरोबर!

**बक्षीः**—इथे असती तर आम्हांजवळ ठेऊन घेतलीच असती. पण ती केव्हां कुठे गेली तें जर मुळीं ठाऊकच नाहीं तर आमचा तरी काय इलाज बरें!

**इसा०ः**—समजला! समजला तुम्हां सर्वांचा मराठी कावा! जिजीला माझ्या हातीं द्यायचें तुमच्या मनांत मुळींच नव्हतें. आणि स्वतःजवळ ठेऊन घ्यावी तर मी केव्हां काय करीन याचा भरंवसा पुरेना, म्हणून तुम्हीं तिला अजीबाद घालवून दिलेंत! कां ? राजेसाहेब, असेंच की नाहीं ?

**जाधव०ः**—मला हो काय विचारतां ? तुम्ही बोलतां यांतलें अक्षरसुद्धां मला समजत नाहीं!

**इसा०ः**—जाधवराव, स्वतः शपथ घेण्याचा कांगावा करून बायकोकडून आणि बक्षीकडून ती शपथ मोडवतां आणि माझ्या डोळ्यांत धूळ फेंकतां, ही बादशाही सरकारशीं तुमची वागणूक हरामखोरीची आहे.

**जाधव०ः**—हां हां मिय्यासाहेब! जपून बोला! फार जपून बोला! माझ्या क्रोधाचा ज्वालामुखी एवढा वेळ मी मोठ्या प्रयत्नानें दाबून धरलेला आहे; तो जर का एकदां भडकला तर कुणाला गिळावें आणि कुणाला वगळावें हें तो जाणणार नाहीं! आतां हरामखोरीविषयीं म्हणाल तर तो शब्द तुमचा तुम्हांलाच चिकटूं पहात आहे. बादशाहांच्या हुकमावरून शहाजी भोंसल्याचा बंदोबस्त करण्याकरितां ही मोहीम झालेली आहे. त्या भोंसल्याच्या पाठीवर जाऊं या म्हणून मी मघांपासून

तुम्हांला सांगत असतां तुम्ही क्षुल्लक बाबतींत तंटे काढून इथे वेळ घालवलात. जर का आज भोंसला हातांतून निसटला तर तुम्ही त्याला आंतून सामील आहां असें लोकांनीं कां म्हणूं नये ? अजूनसुद्धां जलदीनें जाऊं तर भोंसल्याची गांठ खचित पडेल. ( इसामिय्याचा हात धरून ) तर चला आतां ? लवकर जाऊं या.

**इसा०:**—काय करूं ? जिजी हातांत सांपडलेली पुन्हा निसटली ! आणि मोंगलाई गिळून टाकण्याकरितां उत्पन्न होणारें तिचें पोर तिच्या पोटांत अजून शाबूद राहिलें आहे ! धिक्कार असो आमच्या जिण्याला !

**म्हाळसा:**—( स्वगत ) तर मग जीव दे, जीव दे मेल्या ! नुसतीं बोटें मोडून काय करणार आहेस !

**कमाल०:**—जाऊं या कीं मिय्याजी. या जंगलांत आस्वलें, लांडगे, वाघ पुष्कळ आहेत. कोणी तरी तिला खाऊन टाकतीलच ! तुम्ही कां काळजी करतां ?

**इसा०:**—( स्वगत ) जनावरांचा भरंवसा कोण धरतो ? मीच या लोकांची नजर चुकवून पुन्हा इथे येतों आणि जिजाऊला धुंडाळून तिच्या नरडीचा घोंट घेतों ! आज ज्यांनी ज्यानीं मला तोंडघशी पाडलें आहे त्यांवर पहा कसा सूड उगवतों तो ! ( उघड ) चला. राजाजी, झालें तें झालें. जिजाऊ हातची गेली तर जाऊं या. आतां शहाजीला धरण्याच्या उद्योगालाच लागूं या !

( जासूद घाबऱ्या घाबऱ्या येतो. )

**जासूद:**—महाराज ! महाराज ! मोठाच अनर्थ झाला ! अघाडीची फौज शहाजी भोंसल्यानें लुटून बुडवून फस्त केली आणि जगदेव महाराजांना धरून नेलें ! धांवा ! धांवा ! सोडवा त्यांना लौकर !

**जाधव०:**—माझ्या जगदेवाला शहाजी भोंसल्यानें धरून नेलें ! आणि माझ्या-पुढे कुणीकडे जाणार तो भोंसला ? चला. चला ! भले लोक ! मिय्याजी ! करा दौड ! गांठूं या शहाजी भोंसल्याला ! ओहो ! काय ही वावटळ ! काय हे धुळीचे लोट ! आणि त्यांतच मेघांचा गडगडाट ! ( सर्व जातात. ) ( जिजाऊ पुन्हा प्रवेश करते. )

**जिजाऊ:**—( हर्षानें ) महाराजांनीं शत्रूची फौज उधळून लावली आणि जगदेवरावांना धरून नेलें अशी बातमी तो जासूद कर्कश आवाजांत मोठमोठ्यानें

सांगत होता ते शब्द माझ्या कानाला किती मंजुळ मंजुळ लागत होते ! संकटांतून प्राणनाथांची सुटका होण्याकरतां आज मी जिवाचीसुद्धां पर्वा न ठेवतां जें लढाईचें साहस केलें त्याला देवानें उत्तमोत्तम यश देऊन मला कृतार्थ केलें ! ( रायबाकडे पाहून खेदानें ) हें आनंदाचें वर्तमान जर मला रायबाला समजून देतां आलें तर किती छान होईल ? पण बिचारा शुद्धीवर येईल तेव्हां या गोष्टी ! ( रायबा-जवळ जाऊन त्यास हालवते. ) रायबा, सावध आहेस का ? रायबा ! बोल कीरे माझ्याशीं एक तरी शब्द ! ( कानाशीं लागून मोठ्या स्वरांत ) रायबा, तुझे धनी खुशाल आहेत बरें !

**रायबाः**—( सावध होतो. ) धनी खुशाल ? आणि लढाई—

**जिजाऊः**—धन्यानीं लढाई मारली ! मोठी तरवार गाजवली आज त्यांनीं !

**रायबाः**—मोंगल—

**जिजाऊः**—मेले ! पळाले ! भणाण झाले ! पांढऱ्या कावळ्यांकडे गेले !

**रायबाः**—छान ! छान ! तर मग आतां—( उठूं लागतो. )

**जिजाऊः**—हां. हां. उठूं नकोस. हालूं नकोस माझी शपथ आहे हाललास तर ! ( त्याची अवस्था पाहून घाबरते. ) आतां काय करावें ? यानें थोडी चळवळ केली तेवढ्यानेंच याचा जीव कासावीस होऊं लागला ! रायबा, सांग. तुला काय पाहिजे ?

**रायबाः**—पाणी ! पाणी ! बाईसाहेब ! पाणी पाहिजे !

**जिजाऊः**—पाणी पाहिजे तुला ? थांब. कुठून तरी आणून देतें हां. ( जाऊं लागते. )

**रायबाः**—तुम्ही ! तुम्ही ! ( हुंदका आंवरून ) नको पाणी ! नको पाणी !

**जिजाऊः**—अरे काय वेडा आहेस तूं ! मीं पाणी आणलें म्हणून काय झालें ? थांब. आतां पाणी घेऊन येतें. ( जाते. )

( पडदा पडतो. )

---

# प्रवेश ३ रा.



## सीन १.

**स्थळः**—जंगल.

( इसामिय्या येतो. )

**इसा०**:—एकाएकीं वादळ उत्पन्न झाल्यामुळें आमच्या फौजेची चोहोंकडे पांगापांग झाली आणि शहाजीचा पाठलाग रहित झाला; पण जिजाऊचा पाठलाग करायला निघालेला जो मी त्या माझें तसलें वादळ झालें तरी काय करणार आणि मला फौजेचें तरी काय काम आहे? जाधवराव मला इकडे येऊं देतो कीं न देतो ही मोठीच पंचाईत होती, पण वादळानें त्याच्याही फौजेंत धांदल उडवली आहे ती मोडेपर्यंत मी कुठे गेलों आणि काय करतों याची दाद घ्यायला त्याला फुरसत आहे कुठे? आजपर्यंत जिजाऊला धरावें किंवा मारावें म्हणून वेळोवेळ जाळें पसरीत गेलों, पण तिची सलाबतच अशी कीं दरखेपेला माझीच मसलत माझ्यावर उलटावी! आज मी शेवटचा फांसा टाकतों आहें, हा फांसा जर का हुकला तर मोंगल बादशाही जिवंत राहण्याची आशाच धरायला नको! ( किंचित् थांबून ) काय करावें? जिजाऊला पकडण्याची आज या जंगलांत मी किती वेळ तरी खटपट करतों आहें, पण अजून कांहीं ती आटोक्यांत येत नाहीं! एकदां दिसते, पुन्हा नाहींशी होते; पुन्हा दिसते आणि जवळ जावें तों पुन्हा नाहींशी होते! अस्सें एकसारखें चाललें आहे! नुकत्याच शांत झालेल्या वादळांतली ती वीज–क्षणांत पाजळणारी आणि क्षणांत मालवणारी ती अस्मानची मशाल––हातांत पकडणें जितकें अवघड, तितकेंच या जिजाऊला पकडणें अवघड झालें आहे! ( क्षणभर थांबून निश्चयानें ) छे. छे. असें निराश होण्याची ही वेळ नव्हे! बादशहाची दौलत राखणें हें जर माझें कर्तव्य असेल तर आपल्या करामतीची पराकाष्ठा करून मला तें बजावलेंच पाहिजे! तर आतां कसेंही करून जिजाऊचा पत्ता लावतों आणि तिला एकदांची मारून टाकतों म्हणजे सारी कटकट चुकली, आणि चोख्ताई खानदानाची बादशाही निर्धास्त झाली! हा माझा निर्धार आज तडीला तरी नेईन, नाहीं तर या कामांत मरून तरी जाईन! दोहोंतून कोणतीही गोष्ट घडून

आली तरी सर्व लोक माझी वाहवाच करतील आणि म्हणतील कीं, इसामिय्यानें बादशाही सरकारचें निमक खाल्लें त्याचें नामी चीज केलें ! ( जातो. )

---

## सीन. २.

**स्थळः**—जंगल.

( जिजाऊ एकटीच फिरत आहे. )

**जिजाऊः**—रायबाकरतां पाणी शोधायला निघालें ती वादळांत सांपडून सैरावैरा कुणीकडे भटकत सुटलें आहें कुणाला ठाऊक ? ( पाहून ) हो, तो किल्ला समोर दूर दिसतो आहे आणि त्याच बाजूनें मी चाललें आहें एवढें एक बरें आहे. ( अंगावर शहारे आणून ) छे, छे बाई ! काय तें भयंकर वादळ ! वारा तर असा सोसाट्याचा सुटला होता कीं मला सुद्धां आभाळांत उडवून नेतो कीं काय असें भय पडलें होतें ! वारा उडवून नेईल म्हणून वृक्षांना मिठी मारावी तर वृक्षांची तरी कुठे शाश्वती होती ! त्याच वाऱ्यानें मोठमोठे वृक्ष माझ्याच देखत धडाधड उलथून पडत होते ! पावसाचा आणि गारांचा मारा तर कांहीं कांहीं विचारूंच नये. वीज कडाडली म्हणजे पायाखालची जमीन हादरत असे आणि वाटे कीं हीं डोंगरांचीं शिखरें कोसळून आतां माझ्या अंगावर खास पडणार ! शौर्याबद्दल ज्यांची उपमा देत असतात ते वाघसुद्धां त्या वादळांत भयानें गर्भगीळ होऊन आरोळ्या ठोकीत सुटले होते ! मग मी एकटी बायको माणूस गांगरून गेलें यांत नवल तें काय ? दुःखांत सुख एवढेंच वाटत होतें कीं, महाराजांच्या पाठलागाकरितां धांवलेली शत्रूची फौज याच वादळानें घेरली जाऊन जागच्या जागीं थबकली असेल ! आतां वादळ थांबून अंमळ जीव खालीं पडल्यासारखा होतो न होतो तों अनेक अनर्थ व भयें बगलेस मारून व तीं झांकण्याकरतां अंधाराचें जगडव्याळ वस्त्र पांघरून ही असंख्य कल्पें वयाची खोडसाळ म्हातारी—ही रात्र—जणू काय मला मुद्दाम भेटण्यासाठीं जवळ जवळ येत आहे ! एका पंचाइतींतून मोकळें व्हावे तों दुसरी पंचाईत दत्त म्हणून पुढें उभी आहेच ! ( भयचकित मुद्रेनें चोहोंकडे पहाते. ) अलीकडे हजारों शत्रु मला नवीन उत्पन्न झाले आहेत आणि मी या जंगलांत एकटीच हिंडतें आहें. कोणी दुष्ट माणसें मला मारण्याकरतां कुठे दबा धरून बसलीं नसतील ना ? ( किंचित् विचार करून ) छे छे ! उगीच मनाला कांहीं तरी शंका वाटते ! मघांशीं पंच-

महाभूतांनीं जें विक्राळ स्वरूप धरलें होतें तें पाहून भुतेंसुद्धां इथून नाहींशीं व्हायचीं, मग माणसें कुठचीं या प्रदेशांत रहायला! ( बाजूच्या टेंकडीवर इसामिय्या दृष्टीस पडतो त्यास पाहून चपापते. ) अगबाई! भूत म्हटलें नाहीं तोंच त्या टेंकडीवर भूत उभें असलेलें दृष्टीस पडतें आहे आणि तें माझ्याकडेच टवकारून पहातें आहे! ( न्याहाळून ) नाहीं. नाहीं. हें भूतबीत कुणी नसून मघांचा तो इसामिय्या म्हणवणारा मोंगल सरदार इकडे मला शोधीत आलेला असावा हें खास! मी त्याच्या दृष्टीस पडलें आहें तेव्हां आतां लपून छपून कांहीं उपयोग नाहीं. आणि लपायचें तरी काय म्हणून! तो काय करणार आहे माझें? ( तीरकमान सरसावते. )

**इसा०:**—जिजाऊ! थांब, मी तुला शोधीत इतका लांब आलों तो आतां तुला हातची जाऊं देईन असें समजूं नकोस.

**जिजाऊः**—अरे मूर्खा! मला शोधीत तूं आला नाहींस. आपल्या मरणाला शोधीत आलास तूं! जगावें असें तुला वाटत असेल तर या क्षणीं माझ्या नजरेआड हो! ( तीरकमान रोंखून ) हें तुझें मरण पाहिलेंस? तुझा जीव माझ्या मुठींत आहे हें पक्कें समज! उगीच विनाकारण हिंसा करावी हें माझ्या मनाला येत नाहीं म्हणून तुला सावध करतें आहें की, जर तुला जगायचें असेल तर माझ्या दृष्टीस पडूं नकोस?

**इसा०:**—काय? अशा जंगलांत एकटी सांपडली आहेस तरी मलाच दरडावतेस?

**जिजाऊः**—तुर्का! तुला कोण भितें आहे? तूं आपल्या दहा हजार फौजेंत होतास त्यावेळीं मी तुला भ्यालें नाहीं आणि आतां तर तूं एकटा आहेस! तुझें भय मी काय म्हणून मानायचें? तूं एवढा मोठा सरदार आपली फौज सोडून मला धरण्यासाठीं एकटाच या जंगलांत भटकत आलास यावरून तूं द्वेषामुळें वेडा झालेला दिसतोस; आणि म्हणूनच तुला सावधपणाची सूचना देते कीं, तुझें मला कांहीं एक भय नसून माझें मात्र तुला भय आहे. कारण की जेव्हां इच्छेस येईल तेव्हां तुझा प्राण घेणें माझ्या हातांतलें आहे. माझी तिरंदाजी कशी आहे ती तूं पाहिलीच आहेस.

**इसा०:**—( हंसून ) जिजाऊ, ही तुझी तिरंदाजीची घमेंड फुकट आहे! ( तरवार पडताळून ) ही पाहिलीस तरवार? हें एक सामान्य हत्यार आहे असें समजूं नकोस. ही मोंगल बादशहांच्या पुण्याईची तरवार आहे! ही आजपर्यंत ज्या

ज्या माणसावर उपसली गेली तो तो माणूस जिवंत राहिलेला कुणाच्या ऐकण्यांत-सुद्धां नाहीं !

**जिजाऊः**—( तिरस्कारानें ) मोंगल बादशहांच्या पुण्याईची तरवार! अरे मूढा, आतां त्या बादशहांची पुण्याई राहिली आहे कुठे ? तैमूरशहाच्या वंशांतल्या पुरुषांनीं नानाप्रकारचे जुलूम करून रयतेचा छळ केला, आणि चैनींत व व्यसनांत आयुष्य घालवून आपल्या अधिकाराचें सार्थक करण्याकडे दुर्लक्ष केलें; त्यामुळें त्यांवर अल्लाची नाराजी होऊन त्यानें दुनियेची दौलत आतां माझ्या मुलाला दिली आहे. तूं एकटाच काय, पण मोंगल बादशहाचे तुझ्यासारखे लक्षावधि वीर जरी माझ्या किंवा माझ्या मुलाच्या घाताला प्रवृत्त झाले तरी त्यांच्यानें कांहीं एक होणार नाहीं. कारण माझ्या मुलानें बादशाही करावी ही देवाची मर्जी आहे, तिला कोण आड येऊं शकेल ? मोंगल बादशहांच्या पुण्याईची तरवार म्हणून जी तूं मला दिमाखानें परजून दाखवतो आहेस ती तुझी तरवार माझ्या अंगाला स्पर्श करण्यापूर्वी मी माझ्या बाणांनीं तुझ्या अंगाच्या चिंधड्यान् चिंधड्या उडवीन हें तुला कसें समजत नाहीं ? मी इतकें सांगतें तरी तें न जुमानतां तूं जवळ जवळ येतो आहेस ! तुला पुन्हा सांगतें कीं मुद्दाम असें हें स्वतःवर मरण ओढून घेऊं नकोस ! मागें परत ! नाहीं ऐकत ? घे घे तर मग ! ( तीर मारते. इसामिय्या पडतो व उठून लंगडत आणखी पुढें येतो. )

**इसा०ः**—जिजाऊ ! तुझी तिरंदाजी तारीफ करण्यासारखी आहे, परंतु ही तुझा बचाव करूं शकणार नाहीं. माझ्या पायाला तूं जखम केलीस तरी अशाही स्थितींत येऊन तुला गांठण्याची मला हिंमत आहे ! शिवाय जणु काय मला मदत करण्यासाठींच चोहोंकडे काळोख पडत चालला आहे. या काळोखांत मी केव्हां तुझ्या जवळ येऊन पोंचेन हें तुला कळणारसुद्धां नाहीं.

**जिजाऊः**—दैवहीना ! काळोखाचा कशाला भरंवसा धरतोस ? मी शब्दवेधी आहें. मला तूं आसपास आल्याचें ज्ञान होण्याचा अवकाश कीं तूं मेलास म्हणून समज !

**इसा०ः**—( स्वगत ) बडी जवामर्द बेगम ! काळोखांतसुद्धां आवाजाच्या अज-मासानें निशाण मारतें म्हणते हें खोटें असेल असें म्हणवत नाहीं. तर हिनें दिलेला

इशारा घेऊन आगाऊ कांहीं एक मागमूस लागूं न देतां हिला गांठलें पाहिजे. बादशहांच्या पुण्याईची तलवार हिला कस्पटासमान वाटते आं! पाहून घेईन!

( अदृश्य होतो )

**जिजाऊः**—हा जवळ येऊन मला धरण्याची वल्गना करतो ही खरी ठरण्याचा फार करून संभव नाहींच; परंतु हा फार दुष्ट आहे आणि मोठा निग्रही आहे. शिवाय या जंगलांतल्या जागाही फार बिकट आहेत. कुठे आडवाटेनें येऊन जाळींत लपून बसेल आणि एकदम मला धरील असें थोडेंसें भय मनाला आहेच! तसें झालें तर तिथे माझी तिरंदाजी काय करणार? असो. दैवानें पुढें काय घडेल तें खरें! ( आणखी कांहीं पावलें चालून ) आतां किल्लाही नीटसा दिसेनासा झाला! मी चाललें कुणीकडे, माझी काय वाट होणार, कांहीं समजत नाहीं! पाय तर अगदीं थकले. नाहीं आतां पुढें चालवत! ( शिळेवर बसते व निराशेनें उद्विग्न होते. ) हायरे दुर्दैवा! जिचा पति पंचवीस हजार फौजेचा धनी, ती मी आज या जंगलांत इथे थकून बसलें आहें तर मला हात देऊन उठवायलासुद्धां कोणी माणूस जवळ नाहीं आं? जगदंबे! इतक्या संकटांतून तूं मला निभावून आणलेंस आणि आयत्या वेळीं थोडक्यासाठीं मला विसरलीस असेंच म्हणावें कीं काय? मला माझ्या प्राणांची पर्वा वाटत नाहीं, पण तुझ्या कृपेनें माझा बालक सुखरूपपणें जन्माला यावा आणि महाराष्ट्रांत स्वराज्याची स्थापना होऊन या देशाचें दैन्य फिटावें एवढी एक इच्छा आहे. तीही तुला मान्य नसेल तर तुझी मर्जी! ( पडद्यांत "जिजाऊ, भिऊं नकोस!" असा शब्द होतो. ) ( आसपास पाहून ) इथे माणूस तर कुणी दिसत नाहीं! मला अभय देणारी ही आकाशवाणी झाली म्हणावी कीं काय? ( स्वामी प्रकट होतात. त्यांस पाहून हर्षानें ) हे महासमर्थ स्वामीमहाराज आले! आतां सर्व संकटांचा परिहार झाला! ( स्वामीस वंदन करते. )

**स्वामीः**—जिजाऊ, पहा! तूं आपल्या कुलस्वामिनीचें आतांच स्मरण केलेंस आणि त्याबरोबर तुझा समाचार घेण्यासाठीं तिनें मला इकडे पाठवलें. तूं कोणत्या संकटांत पडली आहेस? सांग.

**जिजाऊः**—स्वामिन् आपण सर्वज्ञ आहां. माझी स्थिति आपणाला विदित असलीच पाहिजे! या जंगलांत मी एकटीच सांपडलें आहें. शिवनेरीस मला जायचें आहे. परंतु कुणी वांट दाखवणारा असल्याखेरीज तेथपर्यंत माझें जाणें कसें होईल?

**स्वामीः**—बरें आहे. मी पुढें चालतों. तूं मागून ये म्हणजे झालें. ( दोघें चालूं लागतात. )

**जिजाऊः**—स्वामिन्, आज मला अतिशय कष्ट झाले आहेत त्यामुळें शरीरांत सामर्थ्य अगदीं राहिलें नाहीं. चालतांना फार क्लेश वाटतात, आणि तहानेमुळें माझा जीव तळमळ करतो आहे.

**स्वामीः**—या कमंडलूंतलें तीर्थ प्राशन कर म्हणजे तुझ्या तृषेचा आणि सर्व श्रमांचा परिहार होईल. ( कमंडलूंतलें तीर्थ तिच्या ओंजळींत ओततात. जिजाऊ ओंजळींत तीर्थ घेते व तोंडाजवळ नेऊन थांबते. )

**जिजाऊः**—( गहिंवरून ) नाहीं. नाहीं. हें तीर्थ माझ्यानें प्राशन करवत नाहीं. हें कृष्णार्पण करण्याची मला आज्ञा व्हावी !

**स्वामीः**—हें काय ? जिजाऊ, तीर्थ पोटांत गेलें म्हणजे तुला नवजीवन प्राप्त झाल्याचा सुखकारी अनुभव येईल. पिऊन टाक !

**जिजाऊः**—स्वामी, माझ्या जिवासाठीं जीव देणारे रायबा वगैरे शिपाई घायाळ होऊन मरणाच्या दारीं पडले आहेत. तहानेमुळें त्यांचे प्राण व्याकुळ झाले आहेत हें मला माहीत आहे. या तीर्थांतले चार चार थेंब तरी त्यांच्या मुखांत घातल्या-खेरीज हें माझ्यानें पिववत नाहीं.

**स्वामीः**—वाहवा ! जिजाऊ ! तुझा दयाळू स्वभाव पाहून मन फार प्रसन्न होतें. लक्षावधि लोक पदरीं बाळगून त्यांचें पालन करावें हें तुझें भाग्य आहे, आणि या भाग्याला तूं पात्र आहेस. ज्या इमानी सेवकांबद्दल तूं चिंता वाहतेस ते रायबासुद्धां तुझे सर्व लोक खुशाल आहेत. त्यांच्या जखमांची योग्य प्रकारें निगा होऊन त्यांची शिवनेरीस रवानगी झालेली आहे. तूं निःशंकपणें आपली तृषा शांत कर. ( जिजाऊ तीर्थ पिते. )

**जिजाऊः**—अहाहा ! हें तीर्थ म्हणजे मुमूर्षूला अमृत मिळावें तसेंच मला झालें आहे. हें प्राशन केल्यापासून अंगांत कांहीं एक नवीनच शक्ति व उत्साह वाटूं लागला आहे ! आतां कितीही कोस चालावें लागलें तरी चिंता नाहीं अशी हुशारी मनाला वाटते आहे.

**स्वामीः**—जिजाऊ, आतां निश्चिंत हो, आणि या अरण्यांत वनदेवीप्रमाणें निर्भयपणानें संचार कर. मी तुला मार्ग दाखवतोंच आहें.

**जिजाऊः**—स्वामी, आपल्या आश्वासनावरून मी निश्चिंत झालें, पण माझा संचार निर्भय नाहीं.

**स्वामीः**—तुला कोणतें भय आहे?

**जिजाऊः**—एक मोंगल मला मारण्याकरितां या अरण्यांतून हिंडतो आहे. एकदां तो मला मारूं पहात होता, परंतु देवीच्या कृपेनें त्यावेळी त्याचें निवारण मला करतां आलें. पुन्हां जर त्यानें मला गांठून धरलें तर प्राणावरचा प्रसंग येऊन बेतणार. माझा संचार निर्भय नाहीं म्हटलें तें यासाठींच!

**स्वामीः**—ज्या आदिमायेनें त्या यवनापासून तुझें एवढा वेळ रक्षण केलें ती पुढेंही तसें करीलच, त्यांत काय संशय आहे? तथापि तुझें भय दूर व्हावें म्हणून तुझ्या संरक्षणासाठीं मी मागें चालतों. तूं पुढें हो. आतां आपण पाऊलवाटेला लागलों आहों, त्यामुळें निःशंकपणें तुला चालतां येईल. तो यवन येऊन तुझ्या शरीराला झोंबूं लागला तर त्याचें तत्काळ शासन करण्याकरतां हें शस्त्र तुझ्या हातीं असूं दे. ( कुबडींतून तलवार काढून तिच्या हातांत देतात. )

**जिजाऊः**—( ओशाळून ) आपण सर्व प्रकारें माझें रक्षण करण्याविषयीं समर्थ असतां मीं मनांत भय बाळगावें हें अज्ञान होय! खरें पाहिलें तर मी भयाची शंका धरूं नये व हें शस्त्रही घेऊं नये. ( शस्त्र परत देऊं लागते. )

**स्वामीः**—नाहीं. नाहीं. हें शस्त्र तुझ्याच हातीं राहूं दे.

**जिजाऊः**—बरें आहे. ज्याअर्थीं स्वामींची आज्ञाच होते आहे त्याअर्थीं मला त्याप्रमाणें केलेंच पाहिजे.

**स्वामीः**—जिजाऊ, यापुढें आपल्याला अवघड खिंडींतून जायचें आहे. वाट फार अरुंद असून दोन्ही बाजूंस भयंकर दऱ्या आहेत. जपून चाल बरें! ( खिंड चढूं लागतात तों इसामिय्या जाळींतून बाहेर पडतो व वाट अडवून उभा रहातो. )

**जिजाऊः**—अरे, वाट सोड, कोण आहेस तूं? ( न्याहाळून दोन पावलें मागें सरते. ) हां! ओळखलें. इसामिय्या!

**इसामिय्याः**—म्हटल्याप्रमाणें अचानक घेऊन तुला गांठलें कीं नाहीं?

**जिजाऊः**—चोरासारखें खिंडींत येऊन गांठलेंस एवढ्यानें कांहीं मोठा पराक्रम केलास असें होत नाहीं!

**इसा०ः**—आतां तुला कोण सोडवील?

**जिजाऊः**—दुर्मार्गांचे उच्छेदक स्वामिमहाराज माझ्या पाठीशीं उभेच आहेत. त्यानीं मला आशिर्वादपूर्वक दिलेल्या या खड्गाचें पाणी किती प्रखर आहे हें पाहण्याची तुझी इच्छा असेल तर आतां तुला कळेलच!

**इसा०ः**—उच्छेदाच्या आणि खड्गाच्या भानगडींत लुडबुड करणारा कोण कुठचा हा स्वामी? तुला मारण्याआधीं या गोसावड्याला उचलून दरींत फेकून देतों!

**जिजाऊः**—हां! खबरदार! छत्रपतीच्या राज्यांत साधुसंतांचा उपमर्द सहन केला जात नाहीं. तसला अपराध करणाऱ्याचें मी तत्काळ शासन करीत असतें.

**इसा०ः**—कोण तूं आणि कुठचा छत्रपति? दोघांचेंही शरीर एकाच घावानें दुखंड करतों. (तरवार परजून) ही मोंगल बादशहांच्या पुण्याईची तरवार! (वार करतो. जिजाऊ वार चुकविते.)

**जिजाऊः**—हा नूतन महाराष्ट्राच्या ओजस्वी प्रतिकाराचा प्रथमावतार! (वार करते. इसामिय्या तो वार आपल्या तरवारीनें तटवितो. त्याची तरवार मोडते. तो कमरेचा खंजीर काढूं लागतो.)

**स्वामीः**—जिजाऊ! मार. मार त्याला! खंजीर काढूं देऊं नकोस!

(जिजाऊ जलदीनें वार करिते व त्यास घायाळ करिते. त्याचा तोल जातो व तो दरींत पडतो. स्वामी व जिजाऊ ओणवून दरीच्या अंतर्भागाकडे नजर फेंकतात.)

**जिजाऊः**—स्वामीमहाराज, देहान्तशासनाला पात्र झालेला हा दुरात्मा अजून मेला नाहीं. दरींतल्या एका झाडाला धरून लोंबकळत राहिला आहे. धनुर्विद्येचा प्रयोग करून त्याचें पूर्ण शासन करूं कीं काय?

**स्वामीः**—कांहीं प्रयोजन नाहीं. याउप्पर त्यानें तुला उपद्रव देण्याचा संभव राहिला नाहीं. त्याअर्थी तूं त्याकडे दुर्लक्ष केलेंस तरी चालण्याजोगें आहे.

**जिजाऊः**—एका क्षणांत हा केवढा चमत्कार घडून आला! मोंगल बादशहांच्या पुण्याईची तलवार भंग पावली आणि नूतन महाराष्ट्राचा ओजस्वी प्रतिकार विजयी झाला!

**स्वामी**:—मोंगल बादशहांच्या पुण्याईची तलवार भंग पावली आणि नूतन महाराष्ट्राचा ओजस्वी प्रतिकार विजयी झाला ! जिजाऊ ! महाराष्ट्राचा पुढचा शंभर वर्षांचा इतिहास तूं एक क्षणांत घडवून दाखवलास आणि दोन वाक्यांत बोलून दाखवलास ! ! ! धन्य धन्य आहेस तूं !

**जिजाऊ**:—( नम्रतेनें ) ही धन्यता देवतेच्या लीलेची आणि सद्गुरो, आपल्या चरणाच्या कृपेची आहे ! मी मूढ अबला ! माझें ज्ञान किती, माझें सामर्थ्य किती, माझा अधिकार काय, हें मला समजत नाहीं कीं काय ? जें जें कांहीं माझ्या हातून झालें त्याचा अभिमान मला तिलप्राय असेल तर त्याला आपलेच पाय साक्ष ! निमित्ताकरितां मला पुढें करून जगदंबा या अद्भुत गोष्टी माझ्या हातून घडवीत आहे हें मी जाणतें. महाराष्ट्राची भावी उत्कर्षावस्था आपण सांगितली ती ऐकून मला परमावधीचा हर्ष झाला आहे एवढें मात्र खरें !

**स्वामी**:—जिजाऊ, चल पुढें. आतां थोडें अंतर जायचें आहे. किल्ला समीप आला.

( पडदा पडतो. )

**[ अंक चवथा समाप्त. ]**



# अंक ५ वा.

## प्रवेश १ ला.

**स्थळः—**शिवनेरी किल्ल्याचा पायथा.

( रायबा येतो. )

**रायबाः—**शहाजी महाराजांची सर्व मराठी फौज गोळा झाली तेव्हां त्यांनीं इसामिय्या व जाधवराव यांशी लढाई मारून त्यांची दाणादाण करून इसामिय्यास कैद केलें. लढाईनंतर जाधवराव एका खेड्याचा आसरा धरून निराशेच्या आवेशानें लढतच होते व जीव गेला तरी पराजय कबूल करणार नाहीं अशा हट्टाला पेटले होते. परंतु बाईसाहेबांनीं आर्जवानें मध्यस्थी करून समेट घडवून आणल्यामुळें महाराजांना जाधवराव येऊन भेटले व मोठा आनंदीआनंद झाला. नंतर महाराजांनीं सुलतानाला दौलताबादेस नेऊन पुन्हा तक्तावर बसवलें आणि आपली दुस्तर प्रतिज्ञा पूर्ण केली. जांवयाबद्दल जाधवरावांच्या मनांत जो वैरभाव होता तो आतां नाहींसा होऊन उभयपक्षीं पराकाष्ठेचें सख्य झालें आहे हें पाहून आम्हां सर्वांना आश्चर्य व कौतुक वाटतें. जाधवभोंसल्यांचीं कुटुंबें आतां आनंदानें एकत्र नांदताहेत ! संभाजी राजे सिंगणापुरास देवाचा नवस फेडण्याकरितां महाराजांनीं पाठवले होते ते नुकतेच परत आल्यामुळें या आनंदांत अधिकच भर पडली आहे, आणि सारी मंडळी उत्कंठेनें छत्रपतीच्या जन्माची प्रतीक्षा करीत आहेत. त्या दिवशीं मी लढाईत गोळी लागून पडलों होतों तिथेच मरायचा, पण मी बरा होऊन हे आनंदाचे दिवस पहात आहें ही परमेश्वराची मोठीच कृपा होय ! त्या परमेश्वरी कृपेचा उतराई होण्याकरितां मीं असा निश्चय केला आहे कीं, चिंता आणि दुःख जिथे जिथे माझ्या दृष्टीस पडेल तिथे तिथे त्याचा बीमोड करून टाकायचा ! त्यामुळें अलीकडे मी मोठा जगन्मित्र होऊन बसलों आहें ! ( कमालखान येतांना दृष्टीस पडतो. ) नाहीं म्हणायला हा कमालखान अजून मला फार भितो. त्याच्या मनांतलें तेवढें भय काढून टाकायचें राहिलें आहे खरें ! याला मीं दोनदां

मार दिला आहे त्यामुळें मी आणखी मारीन या धाकानें हा माझ्या वाऱ्यालासुद्धां उभा रहात नाहीं हें ठीक नाहीं. न कळत कां होईना, पण मला एका वेळीं फार महत्त्वाची बातमी देऊन यानें महाराजांचा बचाव केलेला आहे. अशा मनुष्याच्या मनांत माझ्याविषयीं वैषम्य असावें हें चांगलें नाहीं. तर कसेंही करून याच्याशीं समेट केलाच पाहिजे. स्वारी खूब रंगांत आलेली दिसते आहे तेव्हां याच्याशीं बोलतांना मलाही रंगेल व्हायलाच हवें ? (बाजूस उभा राहतो.) (कमालखान येतो.)

**कमाल०**:—( गांजाची झोळी, चिलिम, चिमटा, चकमक वगैरे साहित्य खालीं ठेवून गाऊं लागतो. )

**गांजा पीवे मद्‌मस्त रहे हार्थीके दांत उखाडनको।**

**रायबा**:—( पुढें होऊन )

**ऐसा मूरख गांजा पीवे हांडीभर भात उजाडनको !** ॥

( रायबास पाहून कमालखान घाईघाईनें आपलें सामान गोळा करून जाऊं लागतो त्यास थांबवून ) अरे जाऊं नकोस. थांब.

**कमाल०**:—मी नाहीं तुझ्याशीं बोलायचा. तूं माझा दुष्मन आहेस.

**रायबा**:—पूर्वी मी तुझा दुष्मन होतों खरा, पण आतां दोस्त झालों आहें.

**कमाल०**:—तुझी माझी दोस्ती होणार कशी ?

**रायबा**:—कां बरें ? जाधवरावांची आणि शहाजी राजांची कधींसुद्धां दोस्ती व्हायची नव्हे ती होऊन गेली. मग तुझी माझी दोस्ती होणें काय एवढें अवघड आहे ?

**कमाल०**:—( साशंक मुद्रेनें ) तूं लबाड आहेस ! म्हातारीचें सोंग आणून तूं मला बडवलें आहेस आणि गाढवावर बसवून तूं माझी धिंड काढलेली आहेस. मला तुझा भरंवसा येत नाहीं.

**रायबा**:—त्या मागच्या गोष्टी तूं कशाला काढतो आहेस ? मी तुझी दोस्ती चाहतों असें आतां सांगतों आहें ना ?

**कमाल०**:—खरें बोलतोस ? मला मारणार नाहींस ? माझी धिंड काढणार नाहींस ?

**रायबाः**—अगदीं खरें खरें बोलतों. तुला कांहीं एक इजा कधीं कधीं करणार नाहीं.

**कमाल०:**—बहोत अच्छा! बचन दो!

**रायबाः**—हें घे वचन. ( हातावर हात मारतो. )

**कमाल०:**—बस्स! आतां माझी खात्री झाली. तूं माझा दोस्त झालास खरा! तेरे दोस्तीसे मै बहोत खूष हुवा! मी एक अमोलिक चीज तुला बहाल करतों. ( झोळींतून गांजाची कळी काढून दाखवतो. ) ये देखो वो चीज!

**सब्ज परी रंगभरी गलां मोतियनके हार।**

**रायबाः**—( कळी हातांत घेऊन )

**जिस नरसे प्रीत करे वो छांडे घरदार॥**

यंव रे सब्ज परी! वाहवा रे हिरवी अप्सरा! आग लाव तुझ्या अप्सरेला!

**कमाल०:**—हम तो हररोज इसको आग लगातेही है! इसी लिये मे तुमसे कहेता हूं के इसुको चिलमके बैठकपर बिठाव और आग लगाव!

**रायबाः**—कमालखान, मला नको ती तुझी अप्सरा! ती तुझी तुलाच लखलाभ होवो!

**कमाल०:**—( रागानें ) गव्हार आदमी! लड्डू पेढे खानेवाला! तुजको इसकी क्या लज्जत है! आण ती इकडे! हां रे मेरे प्यारी! सब्ज परी! क्या तेरी अच्छी सुरत है! ( कळी झोळींत टाकतो ) बरें तें राहूं दे. तूं खरोखर मनापासून माझा दोस्त झालास हें खरें ना?

**रायबाः**—होय. खरें आहे.

**कमाल०:**—तूं जी जी फर्मायष करतोस ती ती शहाजी राजे मंजूर करतात हें खरें ना?

**रायबाः**—होय. तेंही खरें आहे.

**कमाल०:**—तर मग राजेसाहेबांच्या दरबारांत माझें काम आहे तें करून देईनास?

**रायबाः**—खचित करून देतों. काय तुझें काम आहे?

**कमाल०:**—माझा इरादा असा आहे कीं, शहाजीराजानीं मला एक ओसाड गांवठण आणि पांच चाहूर जमीन बक्षीस द्यावी.

**रायबा:**—ओसाड गांवठण आणि पांच चाहूर जमीन एवढेंचना? अरे, यांत काय आहे? मोंगलांनीं शेंकडों कोस मुलूख उजाड करून टाकलेला आहे त्यापैकीं तूं मागतोस तसलें गांवठण आणि जमीन तुला देतां येईल! हें इनाम तुला कशाकरतां पाहिजे आहे?

**कमाल०:**—मी तिथे गा[illegible] नांवाचें शहर बसवणार आणि त्यांत रहाण्याची परवानगी फक्त गांजेकसांना देणार! आणि माझ्या जमिनींत मी नुसता गांजा पिकवणार! बस्स! दुनयेंतल्या गांजेकसांची ददात कायमची मोडावी म्हणून अशी ही वसाहत मी बसवणार आहें.

**रायबा:**—तें सगळें ठीक आहे. पण तुझें तें गांजापूर तूं म्हणतोस त्याप्रमाणें वसवलेंस तरी दुसरे दिवशीं ओसाड पडेल!

**कमाल०:**—क्या खराब बात कहता है? ओसाड पडायला काय झालें?

**रायबा:**—तूं तर सर्व जमिनींत गांजा पिकवणार म्हणतोस. मग गांजापूरांतल्या रयतेनें खावें काय? तुझ्या योजनत गांजेकसांच्या जेवणाखाणाची कांहीं सोय केलेली दिसत नाहीं. मग कशाला ते तुझ्या गांवांत रहाताहेत?

**कमाल०:**—( तिरस्कारानें ) अरे कौन पूछता है तेरे खाने और पीनेकु! गांजा! गांजा! गांजा! एक गांजा मिळाला म्हणजे आम्ही गांजेकस स्वर्गाच्या सुखाला लाथ मारीत असतों! तूं मला हें इनाम मिळवून दे आणि पहा कशी मौज करून दाखवतों ती! कधीं मिळवून देतोस? सांग.

**रायबा:**—अरे, इनाम द्यायचें त्याला कांहीं तरी आनंदाचा प्रसंग लागत असतो. थोडा थांब. छत्रपति जन्मास येऊं देत म्हणजे तुला गांजापूरचा इनामदार बनवतों! झालें ना आतां?

**कमाल०:**—( वाईट तोंड करून ) छत्रपति जन्मास येणार केव्हां आणि माझें काम होणार केव्हां कुणाला ठाऊक?

**रायबा:**—त्या गोष्टीला आतां मुळींच उशीर लागायचा नाहीं. बाईसाहेबांचें पोट सकाळपासून दुखतें आहे. त्या केव्हां बाळंत होतील याचा आतां कांहीं एक

नेम नाहीं. ( तोफांची सरबत्ती होते. ) वाहवा! वाहवा! कमालखान! हे तोफांचे आवाज ऐकलेसना? या क्षणीं छत्रपति जन्माला आले बरें!

**कमाल०:**—आणि या क्षणीं गांजापूरचे सुलतान तख्तनशीन झाले बरें! मुजरा कर! माझ्याशीं अदबीनें बोलत जा!

**रायबा:**—( हंसत ) हां जी हजरत! ( सलाम करतो. ) इथून मला आतां जलदीनें किल्ल्यावर गेलें पाहिजे. इथे क्षणभर सुद्धां थांबायला फुरसत नाहीं. ( जाऊं लागतो. )

**कमाल०:**—अरे वो छोकरा! किल्ल्यावर जातोस तर धांवत जा आणि तुझ्या छत्रपतीला कळव कीं, गांजापूरचे सुलतान हजरत कमालखानजी तुझ्या मुलाखतीकरतां येत आहेत आणि ते आपली प्यारी सब्ज परी तुला नजर करणार आहेत!!

**रायबा:**—( जातां जातां ) हजरतसाहेब, आपण किल्ल्यावर येण्याची तकलीफ घेण्याचें कारण नाहीं. आपण आपली हिरवी अप्सरा घेऊन खालींच मजा मारीत बसावें.

**कमाल०:**—तर मग छत्रपतीला गांजापूरच्या सुलतानसाहेबांचा सलाम सांग! एवढें तरी करशील?

**रायबा:**—करीन. करीन. ( जातो. )

**कमाल०:—सब्ज परी रंगभरी बडी गुनगकी खान।**
**जिस नरसे प्रीत करे वो होवे सुलतान!!॥**

( जातो. )

---

# प्रवेश २ रा.

**स्थळः**—शिवनेरीचा किल्ला, सरकारी वाडा. दरबारचा दिवाणखाना.
[ शिवाजी महाराजांस पाळण्यांत घातलें आहे. शहाजी, जिजाऊ,
रायबा, म्हाळसाबाई, जगदेवराव, व इतर स्त्रीपुरुष
मंडळी पाळणा म्हणत उभीं आहेत. स्वामी
व जाधवराव पाळणा हालवीत आहेत,
असा देखावा दृष्टीस पडतो. ]

## पाळणा.

**जो जो जो जो रे । शिवराया ।**
**सुख पावो तव काया ॥**
**जो जो जो जो रे ॥ ध्रु० ॥**

**धर्मध्वज कडकडला । जन गडबडला ।**
**मोहमहार्णवि पडला ।**
**तो तूं ताराया । असहाया । येसि महाराष्ट्रा या ॥**
**जो जो जो जो रे ॥ १ ॥**

**रिपु पापमति । दिशि दिशि उठती ।**
**त्राहि त्राहि जगा करिती ।**
**त्यांतें वाराया । निज ठायां । येसि महाराष्ट्रा या ॥**
**जो जो जो जो रे ॥ २ ॥**

**स्वामीः**—शहाजी राजे, जिजाऊनें किल्ल्याखालच्या शिवाईदेवीला नवस केला होता त्याला अनुसरून या नूतन बालकाचें नांव शिवाजी असें ठेवलेलें आहे. देवीनें मालोजीराजांना वर दिला तो आतां फलद्रूप झाला; कारण तुमच्या वंशांत जन्मास आलेला हा बालक महाराष्ट्राचा पहिला छत्रपति होय! तर सार्वभौम-पदाला योग्य असे छत्रचामरादि उपचार याच मुहूर्तावर या बालकाला अर्पण करण्याचा समारंभ होऊं द्या. राजे, तुम्ही आणि जिजाऊ शिवछत्रपतीला घेऊन

तक्तावर बसा; म्हणजे सर्वांचे मुजरे होण्यास ठीक पडेल. ( स्वामी, जाधवराव व म्हाळसाबाई यांना नमस्कार करून व त्यांच्या पायांवर मूल ठेवून नंतर त्यास घेऊन शहाजी व जिजाऊ तक्तावर बसतात. )

**जाधव०**:—या समारंभांत मीच पुढाकार घेऊन महाराष्ट्राच्या या छत्रपतीला प्रथम मुजरा करतों. शहाजी राजे, जाधव-भोंसल्यांचा दावा आतां माझ्यापुरता तरी संपला आहे. या छत्रपतीचें वर्चस्व आम्ही जाधव कबूल करतों. मोंगल बादशहांना मीं एकदां इमानपूर्वक दिलेलें नोकरीचें वचन आतां परत घेतां येणें अशक्य आहे. तरी पण माझ्या घराण्यांतल्या पुरुषांनीं व इतर सर्व मराठ्यांनीं या छत्रपतीच्या आज्ञेंत रहाण्याचा व त्याची सेवा करण्याचा रिवाज पडावा म्हणून मीच तसें उदाहारण घालून देतों. ( छत्र हातांत घेऊन ) छत्रपति गर्भस्थ असतां त्यांवर माझ्या स्त्रीनें व भावानें हें छत्र धरलेंच आहे. मीं धरायचें राहिलें आहे तें आतां धरतों. ( तसें करतो. ) राजे, माझा मुलगा छत्रपति होईल व त्यापुढें आपणाला मी मुजरा करायला लावीन असें तुम्ही बोललां होतां ती तुमची प्रतिज्ञा देवानें पूर्ण केली. या मुलाला क्षेत्रपति बनविण्याबद्दलची माझी प्रतिज्ञा देवानें पूर्ण केली नाहीं. फार तर काय, पण मुलीच्या बाळंतपणासाठीं आमच्या राणीसाहेबांना इकडे येऊं द्यायचें नाहीं एवढासुद्धां माझा हेका शेवटास गेला नाहीं ! याबद्दल माझ्या मनाला वैषम्य वाटत नाहीं. उलट माझा हा प्रतिज्ञाभंग आज मला सुखदायकच वाटतो.

**स्वामी**:—पण जाधवराव, तुमचा देखील प्रतिज्ञाभंग झालेला नाहीं. मोंगलानीं या देशांतलीं पुण्यक्षेत्रें उध्वस्त केलीं आहेत त्यांचा उद्धार व पालन करणें हें छत्रपतींचेंच काम असल्यामुळें क्षेत्रपति या संज्ञेला तो अर्थातच पात्र होतो. तेव्हां जशी शहाजी राजांची तशीच तुमचीही प्रतिज्ञा पूर्ण झालीच आहे.

**जाधव०**:—( हंसत ) होय. तशा अर्थानें पाहिलें तर माझी प्रतिज्ञा पूर्ण झाली खरी ! ( सर्व पुरुष मंडळी मुजरे करतात. )

**शहाजी**:—रायबा, छत्रपतीच्या जन्मोत्सवानिमित्त बंदिवान सोडून दिले त्यांत सर्वांआधीं इसामिय्यांची मुक्तता केलीच आहे. त्यांना कळव कीं लवकरच तुम्हांला सन्मानानें निरोप देऊं व मोगलाईत तुम्ही सांगाल त्या ठिकाणीं लवाजम्यानिशीं पोंचते करूं.

**रायबा:**—कळवतों. पण मिय्यासाहेबांचें म्हणणें असें आहे कीं, दिल्लीस जाऊन बादशहांना तोंड दाखवावें अगर या देशांत रहावें असें सुद्धां आपल्या मनाला वाटत नाहीं. मक्केस जाऊन ईश्वराच्या चिंतनांत आयुष्य घालवावें असा आपला फार फार हेतु आहे तो महाराजानीं पूर्ण करावा.

**शहाजी:**—बरें आहे. तशीच त्यांची इच्छा असेल तर दाभोळ बंदराच्या अधिकाऱ्यांस पत्र लिहून मक्केच्या यात्रेला मिय्यासाहेबांची रवानगी करून दिली जाईल.

**स्वामी:**—शहाजी राजे, आतां महाराष्ट्रांत छत्रपतीचें नवीन मन्वंतर सुरू झाल्यामुळें अज्ञान, दैन्य व विपत्ति येथून नाहींशीं होतील. येथें सत्य व न्याय यांचा नेहमीं जय होत जाऊन धर्माचा उत्कर्ष होईल; आणि जुलमी शत्रु उच्छेद पावतील; आणि येथें सर्वदा शांततेचें आणि सौख्याचें साम्राज्य नांदत राहील.

**सर्व:**—तथास्तु.

[ पडदा पडतो. ]

**( अंक पांचवा समाप्त. )**

